प्राज्ञमाला क्रम १

# नवमानवतावाद

लेखक

मानवेंद्रनाथ रॉय

अनुवादक

प्रा. गोवर्धन पारीख

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई.

१९५५

# अ नु क्र म णि का

# प्रास्ताविक

' नवमानवतावाद ' हें प्राज्ञमालेंतील पहिलें पुस्तक होय. क्रांतीच्या ध्येयवादास वाहिलेल्या मानवेंद्रनाथ रॉय यांच्या जीवितांतल्या अनुभवाचें व चिंतनाचें सार ह्यांत आलें आहे. गेलीं दीडशें वर्षें क्रातिवादी विचारसरणींचें धुरीणत्व मार्क्सवादास प्राप्त झालें आहे. मार्क्सवादाला प्रायोगिक स्वरूप रशियन राज्यक्रांतीपासून प्राप्त झालें. मार्क्सवादाचा प्रयोग जगांतील अर्ध्या लोकसंख्येच्या प्रदेशांत सुरू झाला आहे. त्या प्रयोगाला मूर्त रूप आता प्राप्त झालें आहे. मानवी स्वातंत्र्याचा निकष लावून मार्क्सवादाचें मूल्यमापन योग्य रीतीने करणें त्यामुळे शक्य झालें आहे. हें मूल्यमापन करण्यास मानवेंद्रनाथ रॉय यांच्यापेक्षा अधिक योग्य व्यक्ति आजच्या पौर्वात्त्य मानवसमाजांत मिळणें शक्य नाही. मार्क्सवादी विचारसरणीचा अंगीकार केलेले व पुन: अनुभवानंतर त्या विचारसरणीच्या प्रभावांतून बाहेर पडलेले असे अनेक थोर ध्येयवादी तत्त्वचिंतक, शास्त्रज्ञ व वाङ्मयकार आज सुधारलेल्या पाश्चात्त्य राष्ट्रांत आहेत. पौर्वात्त्य देशांत मानवेंद्रनाथ रॉय यांच्या इतकें श्रेष्ठ व्यक्तिमत्त्व असलेली व मार्क्सवादाचा अनुभवपूर्वक विचार केलेली दुसरी व्यक्ति नाही. म्हणून आम्ही प्राज्ञमालेचा रॉय यांच्याच पुस्तकापासून शुभ आरंभ करीत आहोंत.

नवमानवतावादाचा अनुवाद मुंबईचे प्रख्यात प्राध्यापक व आमचे मित्र श्री. गोवर्धन पारीख यांनी केला आहे. अनु-

वादाचा त्यांचा अधिकार दुहेरी आहे. एकतर ते अर्थशास्त्राचे प्राध्यापक असून मुंबई विश्वविद्यालयाचे राज्यशास्त्राचेहि अध्यापक आहेत; दुसरें असें कीं मानवेन्द्रनाथ रॉय यांचे गेलीं १६ वर्षे सहकारी म्हणून त्यांनी कार्य केलें आहे. एवंच हा अनुवाद एका योग्य अधिकारी व्यक्तीच्या हातून झाला असल्यामुळे त्याच्या प्रामाण्याबद्दल वाचकास शंका राहण्याचें कारण नाही.

प्राज्ञमालेचा मुख्य उद्देश लोकांना स्वतंत्र रीतीने विचार करण्याचें सामर्थ्य प्राप्त करून देणारे ग्रंथ प्रकाशित करणें हा आहे. रूढिशरणता, शब्दप्रामाण्य, अंधविश्वास, गुरु व नेते यांच्या अधीन विवशपणें होण्याची प्रवृत्ति, भावनांच्या आहारीं सांपडणारा स्वभाव आणि सामुदायिक दडपणाखाली मनाचें व बुद्धीचें स्वातंत्र्य गमावण्याची सवय या गोष्टी व्यक्तींना मानसिक दास बनवितात. अशा प्रकारचें मानसिक दास्य हें भारतीय जनतेने एक पवित्र लक्षण म्हणून मानलें आहे. सुशिक्षितांतील बहुतांश लोकहि असेच मानसिक दास आहेत. या दास्याचा अंत झाल्याशिवाय व्यक्तित्वाचा किंवा मानव्याचा खराखुरा विकास होत नसतो; व्यक्तींच्या ठायीं दडून असणाऱ्या कर्तृत्वशक्ती त्याशिवाय कार्यप्रवृत्त होत नसतात. विकासशील व्यक्तित्व हेंच मानव्य होय. या मानव्याची आवश्यकता भारतास आहे. भारताचें सर्वांगीण दैन्य हें येथील सामान्य माणसांच्या मानसिक दैन्याचें कार्य आहे. मानसिक दैन्य बौद्धिक व वैचारिक जागृतीशिवाय नष्ट होणार नाही.

# प्रास्ताविक

वैचारिक मांद्य हेंच या मानसिक दास्याचें सर्वसाधारण स्वरूप होय. हें मांद्य नष्ट करण्यास वैचारिक संघर्षाची आवश्यकता असते. विविध प्रकारच्या स्वतंत्र संपन्न विचारांचें शिक्षण ज्यांना मिळते तेच वैचारिक संघर्षास प्रवृत्त होऊं शकतात. मनुष्याच्या ठायीं स्वाभाविक रीतीने सूक्ष्म व व्यापक दर्शनाची शक्ति वसत असते. बौद्धिक विवेचकता किंवा बुद्धिवाद यांचा अग्नि या दर्शनशक्तीला सुवर्णाची शुद्धि करावी त्याप्रमाणे शुद्ध करतो, सूक्ष्मता वाढवितो, विचारांस उजळवितो व व्यापक प्रज्ञा-प्रकाशाची बंधनें नष्ट करतो.

बुद्धिवादाचे प्रतीकभूत किंवा प्रभावी विचारसरणींचे प्रतिनिधीभूत असे जे छोटे परंतु महत्त्वाचे ग्रंथ जगाच्या सारस्वतांत आहेत त्यांचा अनुवाद या मालेंत प्रसिद्ध करावयाचा संकेत आहे. त्याचप्रमाणे बुद्धिवादाच्या निकषास उतरणारे किंवा प्रतिभाशाली असलेले असे स्वतंत्र ग्रंथहि यांत प्रकाशित करावयाचे आहेत.

प्रा. गोवर्धन पारीख यांनी 'नवमानवतावादा'चा उत्कृष्ट अनुवाद थोड्या वेळांत करून दिल्याबद्दल त्यांचे आम्ही कृतज्ञतापूर्वक आभार मानतों. मानवेंद्रनाथ रॉय यांच्या पहिल्या वर्षदिनाच्या दिवशीं जानेवारी २५ इ. स. १९५५ ला हें पुस्तक प्रसिद्ध करण्याची संधि लाभली याबद्दल आम्हास धन्यता वाटते.

लक्ष्मणशास्त्री जोशी.

# कम्युनिस्ट जाहीरनाम्यानंतर

## : १ :

कामगार क्रांतियुगाच्या आगमनाची घोषणा करणारा "कम्युनिस्ट जाहीरनामा" प्रसिद्ध होऊन शंभर वर्षे लोटलीं आहेत. हा जाहिरनामा प्रसिद्ध झाला त्याकाळीं भांडवलदारवर्ग उदयास येण्याची क्रिया चालूच होती. या भांडवलदार वर्गाच्या हृदयांत धडकी भरवीत साम्यवादाचा समंध सबंध युरोपभर संचार करीत असल्याची घोषणा त्या जाहीरनाम्यांत करण्यांत आली. या वर्णनांतील युरोपच्या तत्कालीन परिस्थितीचें चित्र फारसें यथार्थ दिसत नसलें तरी दैवदुर्विलास असा कीं आज मात्र तें वर्णन वेगळयाच अर्थाने खरें ठरूं पहात आहे. भांडवलशाहीरूपी व्याधि आणि तज्जन्य यातना यांपासून सुधारलेल्या जगाची मुक्तता करण्यासाठीं याचा अवतार झाला आहे, असा ज्याचा जयघोष करण्यांत आला त्या साम्यवादाचा प्रत्यक्ष व्यवहार पाहिल्यानंतर त्याने आता खरोखरच समंधाप्रमाणे जग ग्रासलें आहेसें वाटूं लागतें. केवळ भांडवलदारांनाच आज या समंधाची भीति वाटते असें नाही; आधुनिक जगांतील प्रगमनशील शक्तींना देखील त्याच्याविषयी गंभीर संशय येऊं लागला आहे. खरोखरीं, या

# नवमानवतावाद

प्रगमनशील शक्तींना प्रस्थापित राजकीय आणि आर्थिक संबंधांत मूलगामी स्वरूपाची नवी जुळवाजुळव करण्याच्या आवश्यकतेची तीव्र जाणीव आहे. तथापि त्याबरोबरच मानवजातीचा मौलिक मोलाचा वारसा म्हणून आजवर जतन केलेलीं मानवी सांस्कृतिक मूल्यें सामाजिक क्रांतीच्या वादळी समुद्रांत निष्काळजीपणामुळे— किंबहुना बेगुमानपणामुळे— गडप होऊं नयेत याकरितां त्यांची रक्षण करण्याची या प्रगमनशील शक्तींची इच्छा आहे. आणि यामुळेच त्यांना साम्यवादाविषयी संशय येऊं लागला आहे.

हा कसला दुर्विलास म्हणावयाचा ? इतिहासाचा कीं दैवाचा ? कांहीहि असलें तरी तो एका विशिष्ट वस्तुस्थितीचा परिणाम आहे हें मात्र निश्चितपणें सांगतां येईल, आणि ती म्हणजे ज्या कामगार क्रांतियुगाच्या आगमनाची एक शतकापूर्वीं मोठ्या गाजावाजाने आणि द्रष्टेपणाच्या आत्मविश्वासाने घोषणा करण्यांत आली तें युग अवतीर्ण झालें नाही, ही होय. विश्वासपूर्वक अपेक्षिलेली क्रांति बव्हंशी पूर्वनिर्णीत स्वरूपांत एका देशांत घडून येण्यासच सुमारें पाउणशें वर्षांचा काळ लोटावा लागला. नंतर इतरत्र पसरून जागतिक क्रांतीचें स्वरूपहि तिला प्राप्त झालें नाही. उलट, रशियांतील क्रांतीनंतरच्या घटनाहि विशेष आशादायक घडून आल्या नाहीत. कम्युनिस्ट जाहीरनाम्यांत वर्णिलेली अद्‌भुतरम्य ध्येयसृष्टि प्रत्यक्ष मूर्त स्वरूपांत आणण्याच्या दृष्टीने त्या घटनांची परिणति झाली नाही. किंबहुना, आधींच त्या

# कम्युनिस्ट जाहीरनाम्यानंतर

क्रांतींत कामगारक्रांतीच्या मुळाशीं असलेली नैतिक प्रेरणा व मानवी कर्तृत्वाच्या अद्भुतरम्यतेची झळाळी लुप्त झाली होती. केवळ एकाच देशांत क्रांति यशस्वी झाली या घटनेचा अर्थ असा कीं या नवीन समाजरचनेंत प्रॉमिथिअसप्रमाणे बंधमुक्त झालेल्या व नव्या जगाची उभारणी करण्यास सिद्ध झालेल्या मानवाचें दर्शन होत नाही; बौद्धिक, नैतिक व सांकृतिक क्षेत्रांत मानवी सर्जनशीलतेच्या बंधनरहित वा अप्रतिहत आविष्काराला वाव मिळत नाही; उलट, ही नवी समाजरचना कामगारवर्गाचा सामुदायिक आत्माच देव्हाऱ्यांत बसवण्याकरतां आणि त्या वर्गातील व्यक्तींनी त्या आत्म्याला शरण जाऊन आपलें सर्वस्व समर्पित करावें या करतांच झाली.

क्रांतीचा असा गर्भपात होऊन एक प्रचंड शोकांतिकाच निर्माण झाली. कामगार-क्रांतियुगाला प्रारंभ होणार, अशी आशा वाटत होती अशा वेळींच क्रांतीचें तिच्या विजयोन्मत्त प्रतिक्रियेंत म्हणजेच प्रतिक्रांतीच्या युगांत परिवर्तन झालें. हा खरोखर एक इतिहासाचाच दुर्विलास होय.

कम्युनिस्ट जाहीरनाम्यानें असा घोषणापूर्वक दावा मांडला होता कीं कामगारक्रांतीच्या विजयाने नव्या मानवी इतिहासाचा आरंभ होणार; या पूर्वींचा काळ म्हणजे इतिहासपूर्व काळ; त्यांत युगानुयुगें मनुष्य वर्गबद्ध समाजरचनेच्या बंधनांनीच जखडला गेला आहे. कामगारक्रांतियुगाची परिणति जागतिक क्रांतींत

होऊन शेवटीं स्वतंत्र मानवाच्या इतिहासाचें नवीन युग अवतरणार! जाहीरनाम्यांत व्यक्त झालेला हा इतिहास-विषयक दृष्टिकोण चुकीचा असला तरी स्फूर्तिदायक होता. तथापि पहिल्या कामगारक्रांतींतून अपेक्षित जागतिक क्रांति जन्मास आली नाही; इतिहासाला प्रारंभ झाला नाही. उलट, आजचें सुधारलेलें जग "इतिहासपूर्व" काळांतच घुटमळत असून "बळी तो कान पिळी" या जंगली कायद्यानुसार मार्गक्रमण करीत विनाशाकडे जात असलेलें दिसत आहे. या अर्धशतकाच्या काळांत गेल्या दोन महायुद्धांपेक्षा कितीतरी पटीनें अधिक विध्वंसक स्वरूपाचें जागतिक युद्ध निर्माण झाल्यास त्यानंतर याहून वेगळें तें काय निष्पन्न होणार?

साम्राज्यशाही राष्ट्रांच्या स्पर्धेमुळे आणि भांडवलशाही अर्थ-व्यवस्थेंतील अंतर्विरोधामुळे पहिलें महायुद्ध झालें. त्यामुळे काम-गारक्रांतीची सुरवात उशीरा कां होईना शक्य झाली. तेव्हां-पासून मार्क्सवादांतील "विरोध व विकास" या पद्धतीनें जणुं सूडच उगवावयास सुरवात केली असें दिसतें. कम्युनिझमचा विरोधक म्हणून फॅसिझमचा उदय झाला. यामुळे दुसऱ्या महा-युद्धांतून विरोधाचा विरोध (negation of the negation) होईल अशी आशा निर्माण झाली. परंतु या युद्धांतून निर्माण झालेली परिस्थिति तिसऱ्या महायुद्धाकडेच जातांना दिसत आहे. आजचें जग या संकटाच्या दिशेनेच वहावत जात आहे. इतकेंच नव्हे तर

# कम्युनिस्ट जाहीरनाम्यानंतर

युद्धांत छिन्नविच्छिन्न झालेल्या जगाने ज्यांच्याकडे 'त्राहि' 'त्राहि' म्हणून आशेने पहावे तेच आजच्या जगाला बेगुमानपणें प्रचंड कड्याच्या टोंकापर्यंत ढकलीत आहेत.

कम्युनिस्ट जाहीरनाम्याने कामगार-क्रांतियुगाच्या आगमनाची घोषणा केली. रशियांतील क्रांतीने त्या युगाला प्रत्यक्ष आरंभ केल्यासारखें वाटलें. तथापि त्यांतून उच्चतर नव्या संस्कृतीचें दृश्य दिसेल अशी आशा आता उरलेली नाही. भविष्यकाळ आशादायक दिसत नसून त्यांत भलतेंच कांही अनपेक्षित वाढून ठेवलेलें दिसत आहे. आजपर्यंत शंभर वर्षें उराशीं बाळगलेला आशावाद एक रमणीय दिवास्वप्नच ठरून, त्याचें पर्यवसान शेवटीं महान् विफलतेंतच होणार काय ? कीं हा साराच प्रकार एक भयानक दुःस्वप्न समजायचें ?

---

## आधुनिक विचारसरणींचा अपुरेपणा

## : २ :

मानवतेच्या भविष्याचें आज दिसत असलेलें निराशाजनक स्वरूप मानवी भवितव्यावर विश्वास असलेल्या सर्व विचारवंतांना अत्यंत अस्वस्थ करील यांत संशय नाही. तथापि त्यामुळें असहायतेच्या आहारीं जाऊन दैववादी बनणें, निष्क्रियता पतकरणें किंवा भेदरून जाऊन स्वस्थ उभे राहणें योग्य होणार नाही. आधुनिक सुसंस्कृत जगाच्या अस्तित्वालाच धोका निर्माण करणाऱ्या या भयानक रोगाचें निदान शोधून काढण्यासाठीं त्यांनी गंभीर चिंतन करणें जरूर आहे. आणि सांपडणारीं कारणें समूळ नष्ट करण्याचाहि धैर्यानें प्रयत्न केला पाहिजे.

आधुनिक जगांत विविध स्वरूपाची वैचारिक कर्मठता आणि अंध विकारवशता आढळते. यामुळे सगळीकडे अगदीं माथेफिरूपणाचें वातावरण निर्माण होत आहे. त्याविरुद्ध पहिली गोष्ट करावयाची म्हणजे विवेकबुद्धीचा आवाज उठवून तिची हांक सर्वत्र ऐकू गेली पाहिजे. आणखी एक महायुद्ध अटळ आहे; तें झाल्यानेंच जुनें जग नष्ट होऊन नव्याची उभारणी करणें शक्य होईल, असें

मानणें म्हणजे एक प्रकारचा असहाय व दैववादी दृष्टिकोणच स्वीकारणें होय ! तें अविचारीपणाचें, बेजबाबदारीचें द्योतक असून अशा कल्पनेला मान्यता देणें हा एक अक्षम्य गुन्हाच म्हटला पाहिजे. इतिहासाच्या मार्क्सवादी आर्थिक नियतिवादाच्या उपपत्तीशीं कदाचित् ती कल्पना जुळत असेल; तथापि तिच्या मुळाशीं मानवी संस्कृतीच्या गतिशीलतेविषयी खोल व खेदजनक अज्ञानच आहे. (भांडवलशाहीच्या) तथाकथित "इतिहासपूर्व" काळांत "बळी तो कान पिळी" याच जंगली कायद्याचें अधिराज्य असणार, अशा प्रकारची बिनबुडाची श्रद्धा या कल्पनेच्या बुडाशीं असून, त्या श्रद्धेंतूनच हा कोडगेपणा ( cynicism ) निर्माण झाला आहे.

जागतिक क्रांतीचा अंतिम विजय शेवटीं आणखी एका युद्धावरच अवलंबून आहे हें मान्य केल्यास क्रांतीच्या कडव्या शक्ती अगदींच तकलुपी वा नाममात्र वा आत्मघातकी यशासाठीं धडपडत आहेत असें म्हणावें लागेल. आणखी एक महायुद्ध झाल्यास त्याचे परिणाम अत्यंत भयानक स्वरूपाचे होतील; कदाचित् आधुनिक संस्कृतीच त्यांत कोसळून पडेल; हें ध्यानांत येण्यास विशेष कल्पनाशक्तीची गरज आहे असें नाही. म्हणून हें संकट टाळण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा होणें जरूर आहे. याकरितां जुने राजकीय सिद्धान्त आणि आदर्श समाजरचने-विषयीचीं तात्त्विक गृहीतकृत्यें यांचा त्याग करणें आवश्यक

आहे. कारण इतिहासाने त्यांचा फोलपणा सिद्ध केला आहे. जणूं-कांही नियतीने निश्चित केलेल्या युद्धाच्या दिशेने जग भरकटत जात आहे; त्याला त्या मार्गापासून परावृत्त करणें हें पाश्चात्त्य पद्धतीची लोकशाही आणि रशियन साम्यवाद या दोहोंनाहि अशक्य आहे. जगाला या अरिष्टापासून वांचवूं शकेल असें स्फूर्तिदायक मार्ग-दर्शन दोहोंपैकीं एकानेहि केलेलें नाही. एकीजवळ, वापरून वापरून जीर्णशीर्ण झालेला केवळ संस्थात्मक सांगाडा आहे; तो स्वीकारल्यास सगळे प्रश्न सुटतील अशी तिची वेडी अपेक्षा आहे. दुसरीकडे, रशियन साम्यवाद अजूनहि समाजरचनेचा नवा आदर्श पुढें मांडतो, पण या आदर्शाचें आकर्षण प्रत्यक्षांत अवतीर्ण होत असतांच नष्ट झालेलें आहे. सर्वंकष सत्ता आणि मानसिक हडेलहप्पी ( Regimentations ) यांपासून जगाला मुक्त करण्याकरितां जे झगडले त्यांना त्या आदर्शाच्या मूर्त स्वरूपांतील प्रत्यक्ष अनुभवामुळे वीट आला आहे.

पाश्चात्त्य लोकशाही आणि रशियन साम्यवाद या दोन शक्ती युद्धोत्तर जगाचें नेतृत्व घेण्यासाठीं धडपडत आहेत. आणि राज-कीय लोकशाही, आर्थिक समता आणि सांस्कृतिक मूल्यांचा मानवी वारसा यांची कदर करणाऱ्या व चाड बाळगणाऱ्या जगां-तील प्रगमनशील शक्तींपुढे या दोन प्रतिस्पर्ध्यांपैकीं कोण पतकरावें असा प्रश्न पडला आहे. मूल्यांचें प्रमाण आणि वर्तमानक्रमाचे नियम समान नसल्यामुळे हेतूंचें ऐक्य व खरें सहकार्य संभवत

नाही. त्यामुळे एकमेकांविषयीच्या शंका व संशय दोघांनाहि संत्रस्त करीत आहेत; एकमेक एकमेकांच्या पाठींत खंजीर खुपसण्याचा प्रयत्न बिनदिक्कतपणें करीत आहेत; आणि आगामी संकटामुळे भीति व अनिश्चितता यांनी वातावरण कलुषित होऊन गेलें आहे. मानवजातीवर आजवर कधींहि आलें नाही अशा प्रकारचें भयानक अरिष्ट आज आलेलें आहे. म्हणूनच या अरिष्टमय परिस्थितींत नवी आशा, नवी श्रद्धा, नवें ध्येय यांची गरज आहे; व आजच्या परिस्थितीस अनुरूप अशा पद्धतीने क्रांतिवादी विचार व व्यवहार यांची मांडणी करणाऱ्या नव्या तत्त्वज्ञानाची आवश्यकता आहे.

आज तरी ही दु:खान्तिका अटळ दिसत आहे. जणूं एकाद्या ग्रीक शोकांतिकेंतील निर्दय नियतीप्रमाणे युरोपच्या रंगभूमीवरील राजकीय नाट्य प्रकट होत आहे. एकीकडे चिरेबंद ( mono-lithic ) सुसंघटित पक्षाच्या हुकूमशाहीवर श्रद्धा ठेवणारे रशिया आणि त्याच्या अंकित राष्ट्रांतील साम्यवादी आहेत. डावपेचाच्या नैमित्तिक गरजांसाठीं जरी प्रसंगविशेषीं ते पक्षाधिष्ठित हुकूमशाहीवर लोकशाहीचें आवरण घालीत असले तरी लोकशाही-पद्धतीसारख्या अन्य मार्गांनी समाजवाद प्रस्थापित होऊं शकतो हें मात्र त्यांना मुळींच पटूं शकत नाही. ज्यांचा भांडवल-शाहीवरील विश्वास पार उडून गेला असून समाजाची नव्याने रचना करावयास ज्या उत्सुक आहेत अशा प्रगमन-

शील शक्ती युरोपांत सगळीकडे आहेत. फॅसिझमविरोधी लढ्यांत इतक्या भयानक यातना त्यांनी सहन केल्या आहेत, इतका अलोट त्यागहि केला आहे कीं त्यानंतर त्यांना आता हुकूमशाहीची नुसती कल्पनादेखील असह्य वाटूं लागली आहे. त्याचप्रमाणे लोकशाहीची परंपरा असलेल्या देशांतील शेकडों समाजवादी विचारांच्या कार्यकर्त्यांना देखील कोणत्याहि स्वरूपाच्या हुकूमशाहीचें वावडेंच आहे. अशा या दोन परस्परविरोधी दृष्टिकोनांचा समन्वय किंवा समझोता होण्याची आशा मुळींच दिसत नाही.

" सोशल डेमोक्रॅटिक " आणि साम्यवादी पक्षांच्या सतत चाललेल्या झगड्यामुळे युरोपचा गेल्या पंचवीसतीस वर्षांतील राजकीय इतिहास कटु आणि कलुषित झाला आहे. त्या इतिहासांतील ही खेदजनक परंपरा पुसून टाकणें अशक्य आहे. कारण या दोन मतांतील भेद केवळ वरवरचा नव्हता. लोकशाही आणि हुकूमशाही या अगदीं भिन्न, परस्परविरोधी कल्पना आहेत. त्यांच्यांत दोन अगदीं भिन्न तत्त्वज्ञानें आणि अगदीं भिन्न सामाजिक व नैतिक वर्तनक्रमाचे नियम तर्कदृष्ट्या अभिप्रेत आहेत.

लोकशाही समाजवाद्यांची किंवा " सोशल डेमोक्रॅटस्"ची मूळ प्रेरणा मानवतावादी परंपरेंत आहे. यामुळे त्यांच्या दृष्टीने समाजसंघटनेचा अर्थ व्यक्तींच्या स्वेच्छाजन्य प्रयत्नांचें संवादित्व, असा होतो. सामाजिक कर्तव्यें करावयास स्वतंत्र मनुष्य उद्युक्त

होतो तो सक्तीमुळे किंवा सामुदायिक अहंकाररूपी आज्ञाकारी देवा-बद्दलच्या पूज्य भावनेमुळे नव्हे; स्वातंत्र्याच्या जाणिवेंतून विकास पावणाऱ्या नैतिक श्रद्धेमुळेच तो तीं कर्तव्यें करीत असतो. या उलट, हुकूमशाहीच्या कल्पनेमुळे आधुनिक जगाची ही सांस्कृतिक परंपरा पूर्णपणें खंडित झाली आहे. युरोपीय पुनरुज्जीवनाच्या काळांतील मानवाने ख्रिश्चन चर्चच्या आध्यात्मिक आधिपत्याविरुद्ध आणि "पवित्र रोमन साम्राज्याच्या" ऐहिक हुकूमशाहीविरुद्ध बंड उभारून आतापावेतों मानवी-स्वातंत्र्यप्रेरणेचा आविष्कार म्हणून जीं सामाजिक व नैतिक मूल्यें निर्माण केलीं तीं सर्व हुकूमशाहींत विनाश पावतात. यामुळेच जगाची दोन विरोधी गटांत विभागणी करणाऱ्या विचारसरणींमध्ये समझोता होणें अशक्य झालें आहे. दोहोंपैकीं कोणीहि प्रचंड बहुमत आपल्या बाजूनें करून दुसऱ्याला निश्चितपणें पराभूत करूं शकणार नाही. कारण दोन्हीहि विचार-सरणी आपापल्यापरीने सदोष आहेत; आजच्या जगाच्या गरजांच्या दृष्टीने अपुऱ्या आहेत. प्रत्यक्ष अनुभवामुळे दोन्हीवरील विश्वास पार उडून गेला आहे.

हुकूमशाहीची कल्पना उच्च ध्येयाचें साधन म्हणून पुढें मांड-ण्यांत येते. तथापि या स्वरूपांत देखील ती कल्पना व तिचा प्रत्यक्ष व्यवहार त्याज्यच म्हटला पाहिजे. उलट, प्रातिनिधिक लोकशाहीच्या मर्यादांकडे देखील इतःपर दुर्लक्ष करणें अशक्य आहे. तिच्यामध्ये नागरिकहक्कांना केवळ औपचारिक स्वरूप

प्राप्त होतें. लोकशाही म्हणजे वर्गीय हुकूमशाहीच होय, ही मार्क्स-वादी टीका चटकन बाजूस सारता येण्यासारखी नाही. तथापि ती अमान्य करून देखील प्रातिनिधिक लोकशाहीच्या अपुरेपणाचे दोष ( inadequacies ) तिच्या स्वरूपांतच अनुस्यूत आहेत, असाच निष्कर्ष आधुनिक इतिहासाच्या चिकित्सक अभ्यासकाला काढावा लागेल. औपचारिक दृष्टीने सार्वभौमत्व सर्व नागरिकांचेंच असतें हें खरें ! परंतु आजच्या अत्यंत गुंतागुंतीच्या औद्योगिक समाजरचनेंत नागरिक आर्थिक दृष्टीने अडचणीच्या अवस्थेंत असल्यामुळे त्यांना या औपचारिक अधिकाराचा परिणामकारक उपयोग करणें अशक्य होतें. कायदा अडचणीच्या प्रसंगीं त्यांना संरक्षण देत नाही. त्याचप्रमाणे प्रातिनिधिक लोकशाहींत जनतेचें सरकारवर कसलेंच नियंत्रण असत नाही, ही एक वादातीत वस्तुस्थिति आहे. दोन सार्वत्रिक निवडणुकींच्या दरम्यानच्या काळांत जनतेला राजकीय जीवनांत स्थान मुळींच नसतें. या काळांत निवडणुकींत बहुमताने निवडून आलेल्या पक्षाला सनदशीरपणें हुकूमशाहीदेखील प्रस्थापित करतां येऊं शकेल. अशा प्रकारें लोकशाहीच्या मार्गानेच सत्तेचा दुरुपयोग होणें शक्य असून कायदा त्याबाबत कसलीच हमी देऊं शकत नाही. ही हमी शेवटीं बहुमतवाल्या पक्षाच्या नैतिक जाणिवेवरच अवलंबून असते. म्हणूनच अशा प्रकारची औपचारिक "पार्लमेंटरी" म्ह०

## आधुनिक विचारसरणींचा अपुरेपणा

संसदीय लोकशाही खऱ्या लोकशाहीचें संरक्षण करूं शकत नाही; किंवा सर्व परिस्थितींत नागरिकांच्या हक्कांचें रक्षण करण्याची हमीहि देऊं शकत नाही. या लोकशाहीच्या तंत्राने एखादा हिटलरच सत्तारूढ झाला असें नव्हे तर लोकशाहीच्या या तंत्राचाच उपयोग करून अस्तित्वांत आलेल्या अनेक हुकूमशाह्यांचीं उदाहरणें गेल्या पंचवीस वर्षांच्या इतिहासावरून देतां येतील. अर्थात् सत्तारूढ झाल्यानंतर या •हुकूमशहांनी ज्या शिडीने ते सत्तारूढ झाले ती शिडीच लाथेने दूर झुगारून दिली; ही गोष्ट निराळी !

संसदीय ( पार्लमेंटरी ) किंवा प्रातिनिधिक लोकशाहींतील मूलभूत दोष हा उदारमतवादाचें तत्त्वज्ञान आणि त्याचा प्रत्यक्ष राजकीय व्यवहार यांतील विरोधांतून निर्माण झाला आहे. आपल्या मानवतावादी परंपरेनुसार उदारमतवादाने व्यक्ति-स्वातंत्र्याची घोषणा केली खरी ! परंतु आर्थिक क्षेत्रांत मुळींच ढवळाढवळ न करण्याचा आदेशहि त्याने दिला. त्याचा उपसिद्धान्त म्हणून कमींतकमी ढवळाढवळ वा हस्तक्षेप करणारें राज्य इष्ट होय ही कल्पना निघाली. यामुळे जीवघेण्या आत्यंतिक स्पर्धेने जीवन व्यापलें जाऊन त्यांत व्यक्ति बिचारी निर्बल व असहाय ठरली. अशा प्रकारें उदारमतवादाच्या सामाजिक व राजकीय व्यवहारामुळे त्या तत्त्वज्ञानाच्या नैतिक श्रेष्ठतेलाच खो बसला; आणि साहजिकच प्रातिनिधिक लोकशाहीचा बोजवारा

उडाला. फॅसिझमचा जो उदय एकाद्या वादळाप्रमाणे अकस्मात् झालेला दिसून येतो त्याची बुद्धिवादी उपपत्ति एरवी लागणें अशक्य आहे.

दोन महायुद्धांच्या दरम्यानच्या काळांत युरोपांत निर्माण झालेले सामाजिक व आर्थिक प्रश्न प्रातिनिधिक लोकशाहीच्या मर्यादित चौकटीत सुटूं शकले नाहीत. यामुळें प्रातिनिधिक लोक-शाहीवर गंडांतर कोसळलें व त्यांतूनच फॅसिझमचा उदय झाला. म्हणून फॅसिझमचा पाडाव करून टिकून राहावयाचें झाल्यास लोकशाहीस औपचारिक ( पार्लमेंटरी ) संसदीय पद्धतीच्या मर्यादां-तून बाहेर पडलेंच पाहिजे. ' पार्लमेंटरी ' पद्धतीचा मूळ आधार जो मतदारसंघ त्यांतील मतदार परस्परांपासून विलग अणूप्रमाणे इतस्ततः विखुरलेले असून बिचारे असहाय बनलेले असतात. अशा ' पार्लमेंटरी ' लोकशाहीऐवजी सरकारवर सातत्याने नियंत्रण ठेवणारी संघटित लोकशाही हाच नव्या समाजरचनेचा पाया झाला पाहिजे. लोकशाहीविषयीचा दृष्टिकोण अशा नवीन दिशेकडे वळविल्यास तो आधुनिक प्रगमनशील जगाला सामाजिक व आर्थिक पुनर्रचनेच्या नवनवीन क्षितिजांचें दर्शन घडवील. आणि मग अशा कार्यांत अनिश्चित काळपर्यंत अडचणी सहन करण्याची, रक्त व अश्रू गाळण्याची गरजच उरणार नाही. किंवा शांततामय विकासाचा अन्य कोणता मार्ग काढावा या विषयीं संशय वाटण्याचें कारणहि उरणार नाही.

# आधुनिक विचारसरणींचा अपुरेपणा

मानवी संस्कृतीच्या आरंभापासून संचित होत आलेल्या सांस्कृतिक मूल्यांचें भांडार रितें झालें आहे असें समजण्याचें कारण नाही. क्रांतिवादी आणि भावुकतावादी, आदर्शवादी (Utopian) आणि चैतन्यवादी यांनी आजवर उज्वल भवितव्याचीं स्वप्नें पाहिलीं आहेत. हीं स्वप्नें साकार करून भविष्याची भव्य रमणीय इमारत भूतकाळच्या या मूल्यवान् वारशाच्या भक्कम पायावरच उभारणें शक्य आहे. समाजवाद किंवा साम्यवादाचीं बीजें भांडवलशाही समाजरचनेच्या गर्भातच विकसित झालीं असें म्हटलें जातें. हें जर खरें असेल तर खऱ्याखुऱ्या विमुक्तीप्रत नेणाऱ्या आगामी तत्त्वज्ञानाची प्रेरणा देखील तथाकथित भांडवलशाही सांस्कृतिक जीवनाच्या नैतिक व आध्यात्मिक मूल्यांतच सापडली पाहिजे असेंच म्हणावें लागेल.



# साम्यवादी तत्त्वें व व्यवहार यांचा अधःपात

## : ३ :

एका देशांत कामगारवर्गाने राज्यसत्ता हस्तगत केली आणि कामगारक्रांतीचें युग समाप्त झालें. एकंदरीने पाहतां विशेषतः क्रांतीच्या विधायक बाजूचा विचार केल्यास, ही क्रांति, मार्क्स-वादाच्या योजनेनुसार घडून आली नाही. क्रांतीचा आरंभीचा टप्पा देखील मार्क्सवादी सांच्याशीं जुळणारा नव्हता. त्या सांचेबंद मीमांसेप्रमाणे कामगारक्रांति व्हावयाची तर ती आधुनिक जगाच्या ऐन प्रवाहापासून दूर अशा एकाद्या मागासलेल्या देशांत न होतां इंग्लंडसारख्या पुढारलेल्या राष्ट्रांतच व्हावयाला हवी होती. या दृष्टीने पाहतां रशियन राज्यक्रांति ही एक आकस्मिक घटनाच होय. परिस्थितीच्या विशिष्ट अवचित जुळणुकीमुळे किंवा योगायोगानेच ती घडून आली. ऐतिहासिक नियतिवादामागील यांत्रिक दृष्टिकोण तिने फोल ठरविला आहे. ऐतिहासिक विकासक्रमाच्या पूर्वसिद्ध योजनेचा एक भाग म्हणून ती कांही घडून आली नाही. आणि त्यामुळे जागतिक क्रांतीची उठावणी तिच्याकडून झाली नाही. उलट, ही क्रांति झाल्यानंतर लवकरच म्हणजे १९२१ सालींच ती अन्यत्र पसरण्याची शक्यता नाहीशी झाली.

## साम्यवादी तत्त्वें व व्यवहार यांचा अधःपात

रशियाला क्रांतीनंतर आपली नौका सर्वस्वीं अज्ञात अशा समुद्रांतच हाकारावी लागली. क्रांति यशस्वी होतांच आर्थिक पुनर्रचनेचा प्रश्न निर्माण झाला; आणि मार्क्सने त्यासंबंधीं कांहीहि लिहिलें नाही हें लेनिनच्या चटकन ध्यानांत आलें. मार्क्सचे सगळे आर्थिक सिद्धान्त टीकात्मक आहेत. मार्क्सचें लक्ष भांडवलशाहीची रचना पाहण्यांत गुंतलें होतें. भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या समीक्षेंतून तिच्यांतील अंतर्विरोध उघड करून दाखविणें हाच त्याचा खरा हेतू होता. योग्य वेळीं भांडवलशाही या अंतर्विरोधाच्या भाराखालींच कोसळून पडेल आणि तिच्या विनाशांतून समाजवादाचा उदय होईल असें भविष्य त्याने वर्तविलें. भविष्यवाद्याच्या दृष्टीने त्याने इतिहासाकडे पाहिलें. त्यामुळे समाजवादी रचनेच्या स्वरूपाविषयी त्याने विचार केला नाही. "पुनर्रचना शेवटीं उत्पादनशक्तींच्या विकासावर अवलंबून राहील. या शक्तींना क्रांतीने एकदा भांडवलशाहीच्या बेड्यांतून मुक्त केलें म्हणजे झालें; भविष्यांतील प्रश्न त्या त्या वेळीं पाहून घेतले जातील," अशी मार्क्सची दृष्टि होती. मार्क्स हा यामुळे समीक्षक किंवा टीकाकार ठरतो. त्याच्या मोठमोठ्या ग्रंथांत सामाजिक रचनेविषयी कांहीहि आढळत नाही. उलट, भविष्याविषयी अशा प्रकारचा रचनात्मक विचार करणें हें त्याला स्वप्नरंजन वाटें; आणि तो त्याची निर्भर्त्सना करी. त्यामुळेच समाजवादी अर्थव्यवस्थेसंबंधीं मार्क्सच्या लेखनांत एक शब्दहि आढळत

नाही, असे उद्गार आपल्या “ नव्या आर्थिक धोरणाचें ” समर्थन करतांना लेनिनने काढले.

क्रांतीनंतरच्या राजकीय आचरणासंबंधानेहि मार्क्सने कांहीहि लिहिलेलें नाही. भांडवलदारवर्गाला सत्तेवरून खाली खेचल्यानंतर त्याचा विरोध दडपून टाकण्याचें साधन म्हणून त्याने कामगार-हुकमतीचा सिद्धान्त मांडला. परंतु त्यानंतर काय होणार, क्रांतीनंतर समाजाचें राजकीय संघटन कशा प्रकारें करावयाचें, शासन-व्यवहार कसा चालवावयाचा हें सर्व भविष्यकाळावर सोंपवून दिलें. मार्क्सवादी इतिहासोपपत्तीप्रमाणे भविष्यकाळांतील घटना पूर्वनियत असल्या तरी त्या अचूक वर्तविणें दुष्कर होय. “ राज्यसंस्था विरून जाईल ” हें स्वप्नरंजनात्मक ध्येय मांडून मार्क्सने या राजकीय प्रश्नाचें उत्तर देण्याचें टाळलें. नव्या व्यवस्थेंत आर्थिक संबंध कशा प्रकारचे राहणार हाहि एक प्रश्नच होता. उत्तर देतांना मार्क्स अराजकतावादाकडे वळला आणि “ प्रत्येकाकडून त्याच्या कुवतीप्रमाणे काम घेतलें जाईल व प्रत्येकाच्या गरजा पूर्ण केल्या जातील ” हें तत्त्व सांगून मोकळा झाला. लेनिनने तर “ हें तत्त्व म्हणजे एक व्यर्थ, निरुपयोगी घोषणा होय ” असें म्हटलें आहे. आणि लेनिनला प्रमाण मानून स्टालिनप्रणीत राज्यघटनेमध्येहि ह्या घोषणेंत, “ प्रत्येकाकडून त्याच्या कुवतीप्रमाणे काम घेतलें जाईल आणि त्याच्या कामाप्रमाणे त्याला दाम देण्यांत येईल ” अशी

सुधारणा करण्यांत आली. मूळचें मार्क्सचें विधान ही निरुपयोगी घोषणा मानली तर या नव्या स्वरूपांतील विधानांतहि पुनरुक्तीचा दोष आहेच. तथापि तें अगदीं अर्थशून्य आहे असें मात्र म्हणतां येणार नाही. नव्या समाजव्यवस्थेंत आर्थिक विषमता आणि तज्जन्य अन्याय राहणारच असा याचा अर्थ आहे. आणि या विषमतेचें व अन्यायाचें त्यामुळे समर्थनहि होतें. कामाचें योग्य मूल्यमापन करण्याची न्याय्य पद्धति अस्तित्वांत नाही. अमक्या कामाचा इतका मोबदला असें अचूक सांगतां येणार नाही. म्हणजे या बाबतींतील अखेरचा निर्णय शेवटीं सत्ताधीशांच्या हातींच सोंपविला जातो. त्याचा काय परिणाम झाला आहे हें आता सुविदितच आहे.

क्रांतीनंतरचा रशियांतील आर्थिक व राजकीय व्यवहार हा पूर्णपणें कामचलाऊ व्यावहारिकतेच्या कल्पनेवरच आधारलेला आहे. त्याला कोणतेंहि तात्त्विक अधिष्ठान नाही. मार्क्सवादाच्या तात्त्विक भूमिकेशींहि त्याचा कसलाच संबंध नाही. म्हणून या व्यवहाराला समाजवादी किंवा साम्यवादी म्हणणें अयुक्त होय. उलटपक्षीं, साम्यवाद्याच्या द्रष्ट्याने — मार्क्सने — नवी समाजरचना कशी उभारावयाची याविषयी कांहीहि सांगितलें नाही; तिची सामान्य स्थूल रूपरेषाहि त्याच्या लेखनांत नाही; यामुळे साम्यवाद हें लेबल कशालाहि लावणें शक्य झालें आहे. म्हणून सोव्हिएट राज्य-यंत्र व सोव्हिएट अर्थव्यवस्था हीं साम्यवादी नव्हत हें कोणासहि

सिद्ध करतां यावयाचें नाही. एकेकाळीं जेव्हां साम्यवाद ही केवळ कल्पना होती, तिला मूर्त स्वरूप अद्यापि यावयाचें होतें, त्यावेळीं तिचें तात्त्विक समर्थन करतांना अनेकांनी स्फूर्तिदायक, रमणीय वा काल्पनिक चित्रें रंगविलीं. त्या चित्रांचा आणि रशियांतील नव्या समाजरचनेंतील प्रत्यक्ष वस्तुस्थितीचा मेळ बसूं शकत नाही. समाजवादी नवरचनेचा आदर्श आणि प्रत्यक्ष वस्तुस्थिति यांतील या विसंगतीमुळे अनेकांच्या त्या संबंधीच्या उत्साहावर विरजण पडलें आहे. एकामागून एक घडणाऱ्या घटना म्हणजे प्रगति, असें ज्यांना वाटत नाही, घटनांच्या पौर्वापर्याचा अर्थ लावून त्याच्या आधारें निर्णय घेण्याचा जे प्रयत्न करतात अशांना या निराशाजनक विसंगतीमुळे आत्मसंशोधन करणें प्राप्त झालें आहे.

यापुढें प्रस्थापित अर्थव्यवस्था आणि सामाजिक क्रांति यांतील निवड करण्याचा प्रश्न उरलेला नाही. किंवा एकीकडे विनाशाप्रत जात असलेली क्रूर, जुलमी, अन्याय्य भांडवलशाही आणि तिच्या रक्षणार्थ निर्माण झालेली फॅसिस्ट झोटिंगशाही आणि दुसरीकडे राजकीय लोकशाही व आर्थिक समता यांवर आधारलेली नवी समाजव्यवस्था यांमधील निवडीचाहि प्रश्न नाही. आता खरा निवडीचा प्रश्न नव्या समाजव्यवस्थेचा आदर्श आणि साम्यवादाच्या रशियांतील प्रत्यक्ष व्यवहारांतून निर्माण झालेली नवी वस्तुस्थिति यांतून काय निवडायचें, हा आहे.

## साम्यवादी तत्त्वें व व्यवहार यांचा अध:पात

क्रांति होण्यापूर्वी सामाजिक न्यायाच्या पुरस्कर्त्यांना आपला मार्ग निवडणें सोपें होतें. आता क्रांतीनंतरच्या काळांत निर्माण झालेल्या पर्यायांपैकीं एकाची निवड करणें हें स्वतंत्रपणें विचार करणारांना अत्यंत कठिण झालें आहे. साम्यवादाचा प्रत्यक्ष व्यवहार निराशाजनक आहे, इतकेंच नव्हे तर त्याच्या प्रत्यक्ष अनुभवामुळे मूळ आदर्शाविषयी देखील संशय निर्माण होऊं लागला आहे. आपण ध्येयाच्या जवळ जात आहोंत असें वाटावें आणि प्रत्यक्ष अनुभव अपेक्षेहून भिन्नच यावा, असें प्रत्येक वेळीं घडत आहे. यामुळे या ध्येयाच्या मागे जाण्यांत तरी काय अर्थ ? असा प्रश्न निर्माण होऊं लागला आहे. त्याबरोबरच हेंहि खरें कीं प्रचलित प्राप्त परिस्थिति प्रत्यहीं असह्य होत असून अधिकाधिक लोकांना नव्या समाजरचनेची गरज तीव्रतेने भासूं लागली आहे. क्रांतिकारकांमध्ये अशा प्रकारचा तीव्र स्वरूपाचा अंतर्गत भावनात्मक कलह निर्माण झाला आहे. आणि यामुळे साम्यवादी आंदोलन व त्याच्या परिसरांत वावरणारे यांच्यावर एक प्रकारची चमत्कारिक संकटमय अवस्था येऊन ठेपली आहे.

जे स्वत: विचार न करणारे, केवळ कडव्या श्रद्धेने चालणारे होते त्यांचें अंधश्रद्धाजन्य प्रामाण्यबुद्धीने ( रशियन साम्यवादी राज्यास प्रमाण मानून ) काम भागलें. इतरांनी आरंभीं " थांबा व पहा " अशा प्रकारचा आशेचा दृष्टिकोण स्वीकारला. रशियन प्रयोगांतील उद्वेगजनक गोष्टी त्यांना दिसत असल्या तरी त्या

विशिष्ट अडचणीच्या परिस्थितीमुळे निर्माण झाल्या असून तात्कालिक स्वरूपाच्या आहेत; क्रांति इतर देशांत पसरतांच त्या नाहीशा होतील, असें ते मानीत. तथापि प्रतिक्रांतीचा विजय होत जाऊन जागतिक क्रांतीची आशा जसजशी नाहीशी होऊं लागली तसतशी भाबड्या अपेक्षांतून निर्माण झालेली ही सहिष्णु वृत्ति फार काळ टिकून राहणें अशक्य झालें. त्यामुळे साहजिकच विचारमंथन सुरू झालें. त्यांतून एका बाजूला सर्वाधिकारी सत्तेच्या आशेवर पोसली जाणारी अंधश्रद्धेची वृत्ति आणि दुसऱ्या बाजूला नवीन बदलत्या परिस्थितींतील प्रश्न सोडविण्याला आवश्यक असलेली बुद्धिवादी वृत्ति यांतील भेद स्पष्ट होऊं लागला. साम्यवादी नसलेली पण साम्यवादाबद्दल सहानुभूति बाळगणारी सभोंवतालची मंडळी सोडून जाऊं लागली. त्यामुळे साम्यवादी आंदोलन दुबळें झालें आणि रशियन राज्ययंत्राने वेळोंवेळीं आखून दिलेल्या व्यवहाराच्या संपूर्ण अंकित बनलें. यापुढें जागतिक क्रांति यशस्वी करणें हें त्या आंदोलनाचें उद्दिष्ट न राहतां, स्वतःला समाजवादी म्हणविणाऱ्या रशियन "राष्ट्रीय" राज्याचें संधिसाधु धोरण प्रभावी करणें हेंच त्याचें कार्य बनलें.

साम्यवादी आंदोलनावर आलेल्या या अरिष्टाने पहिला बळी घेतला, म्हणजे जागतिक क्रांति यशस्वी करण्याकरितां कम्युनिस्ट इंटरनॅशनल ही जी संघटना स्थापन करण्यांत आली होती तिची आहुति पडली. क्रांतिपूर्वीच्या साम्यवादामधील आणि

# साम्यवादी तत्त्वें व व्यवहार यांचा अध:पात

क्रांतिनंतरच्या साम्यवादामधील तत्त्व व प्रत्यक्ष व्यवहार यांच्या विसंगतींनी व विरोधांनी कम्युनिस्ट इंटरनॅशनल अगदी जर्जर होऊन गेली होती. रशियन साम्यवादी पक्ष हा एकटाच सत्तारूढ पक्ष असल्यामुळे त्यानेच इंटरनॅशनलच्या नेतृत्वाचा मक्ता आपणांकडे घेतला. इतर राष्ट्रांतील पक्षांना क्रांतिपूर्व परिस्थितींत कार्य करावयाचें होतें. या क्रांतिपूर्व परिस्थितींत निर्माण होणाऱ्या निरनिराळ्या प्रश्नांबाबत आपलें धोरण विवेकशीलतेने व जागरूकपणें ठरविणें त्या पक्षांना शक्य होतें. पण तें स्वातंत्र्य ते पक्ष स्वेच्छेने गमावून बसले. साम्यवादी व्यवहारांतच नव्हे तर तत्त्वज्ञानांत देखील रशियन साम्यवाद्यांचेंच मत प्रमाण मानलें जाऊं लागलें. क्रांतीनंतर उत्पन्न झालेल्या अनपेक्षित परिस्थितींत रशियन कम्युनिस्टांनी जो व्यवहार केला तोच मार्क्सवादी तात्त्विक सिद्धान्तांचा आधार बनून मार्क्सवादाचा अध:पात सुरूं झाला. जागतिक क्रांतीची संभाव्यता आणि पहिल्या कामगारक्रांतींतून निर्माण झालेल्या राज्याचे स्वार्थी हितसंबंध यांत विरोध निर्माण झाला. एका देशांत समाजवाद प्रस्थापित करण्याचें धोरण जागतिक साम्यवादाचें ध्येय प्रत्यक्षांत आणण्याच्या आड आलें.

सोव्हिएट प्रजासत्ताक हें राष्ट्रवादी राज्य बनलें. तें 'वेगळ्या' प्रकारचें असेल पण राष्ट्रवादीच आहे. आणि यामुळे आंतरराष्ट्रीय सत्ता-राजकारणाच्या भोंवऱ्यांत तें अपरिहार्यतेने ओढलें गेलें.

समाजवाद किंवा साम्यवाद म्हणजे दुसरें तिसरें कांही नसून राज्याधिष्ठित भांडवलशाहीच होय, हें रशियाच्या अनुभवाने सिद्ध केलें. रशियांतील कम्युनिस्ट राष्ट्रवादी राजवट आधींच तंग झालेल्या जागतिक परिस्थितीचाच एक भाग बनली. किंबहुना तिच्यामुळे या तंग परिस्थितींत भर पडून मूळचें अस्थैर्य किती तरी वाढलें. सत्तेच्या धुमश्चक्रींत वैचारिक प्रश्न मागे पडले. तथापि भांडवलशाही व साम्यवाद यांच्यांतील विरोध ज्याप्रमाणे मिटवतां येणें कठिण त्याचप्रमाणे दोन राष्ट्रवादी राजवटींतील विरोध देखील मिटविणें कठिण असतें. आज सुरूं असलेला कलह हा क्रांति व प्रतिक्रांति यांजमधील कलह नाही. दोन भिन्न प्रकारच्या राष्ट्रवादी राजवटींच्या हितसंबंधांतील तो कलह आहे. आणि त्यांतून मानवी संस्कृतीचा विनाश करील अशा सर्वंकष, विश्वव्यापी तिसऱ्या महायुद्धाची भीति निर्माण झाली आहे. या परिस्थितींतून बाहेर पडायला कोणताच मार्ग नाही काय? आणखी एक संस्कृति विलयाला गेली एवढीच निशाणी इतिहासांत उरणार काय?

महायुद्धाचें हें भयानक संकट टाळावयाचें असल्यास साम्य-वादाच्या फसव्या ध्येयापलीकडे आपणांस पाहिलें पाहिजे. मानवी बुद्धिचातुर्य आणि सर्जनशीलता यांवर आपली श्रद्धा अचल ठेविली पाहिजे. त्यांना ओहोटी लागली आहे असें समजण्याचें कारण नाही. सामाजिक न्यायावर आधारलेली नवी समाजरचना

स्थापण्याच्या कामीं आपण अग्रेसर बनलें पाहिजे. असें अग्रेसरत्व पतकरणारांनी मार्क्सच्या भविष्यवादी विचारसरणीच्या नियतिवादाविरुद्ध बंड उभारून समाजरचनाशास्त्रामध्ये स्थापत्यविशारदा-(एंजिनीयर) प्रमाणे शास्त्रशुद्ध व आस्थापूर्वक लक्ष घातलें पाहिजे. समाजरचना अशी घडवून आणली पाहिजे कीं जींत व्यक्तिस्वातंत्र्य आणि नियोजन, व्यक्तीचें स्वायत्तत्व आणि सामुदायिक कल्याण व प्रगति यांचा समन्वय साधेल.

---

## मार्क्सवादाचें उदारमतवादी पितृत्व

: ४ :

मार्क्सवादाने केलेल्या भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या समीक्षेची यथार्थता इतिहासाने स्पष्ट केली आहे. तथापि भांडवलशाहीचें स्थान अपरिहार्यपणें समाजवादच घेणार हा सिद्धान्त मात्र इच्छानुगामी विचारसरणीचाच द्योतक असल्याचें सिद्ध झालें आहे. इतिहासाच्या आर्थिक उपपत्तीने मार्क्सवादाला गोत्यांत आणलें आहे. इतिहासाच्या तत्त्वज्ञानांत केवळ उत्पादनशक्तींचाच विचार करणें योग्य नव्हे; इतर घटकांकडे — विशेषत: विचारांच्या विकासाकडे — दुर्लक्ष केल्यास आणि नैतिक प्रश्नांची उपेक्षा केल्यास त्या तत्त्वज्ञानांतून विधायक सामाजिक कार्याचें विश्वसनीय मार्गदर्शन मिळू शकणार नाही. मार्क्सवादी इतिहासवादाची कसोटी लागली असून तो त्या कसोटीस उतरला नाही असें आढळून आलें आहे. निर्माण झालेल्या अरिष्टमय परिस्थितींतून बाहेर पडण्यासाठीं आधुनिक जगाला नव्या व अधिक व्यापक स्वरूपाच्या सामाजिक तत्त्वज्ञानाची खरी निकडीची गरज आहे. उलट, राजकीय तत्त्वसरणी आणि नैतिक सिद्धान्त यांनी समाजाच्या

भौतिक गरजांकडे म्हणजेच आर्थिक प्रश्नांकडे दुर्लक्ष करतां कामा नये. नाहीतर त्यांना दुराग्रहाचें आणि फसवें स्वरूप प्राप्त होईल.

समाजवादी व साम्यवादी आंदोलनांत मुळांत नैतिक तळमळीचा अभाव नव्हता. या आंदोलनांच्या आरंभीच्या प्रणेत्यांनी भांडवलशाही अर्थव्यवस्थेचा अनैतिक म्हणून खरोखर धिक्कार केला. नव्या समाजव्यवस्थेच्या स्थापनेच्या मागणीमागील खरा आधार नैतिक होता. सामाजिक न्यायाच्या मागणींतील नैतिक भावार्थ कोणालाहि प्रतीत होण्यासारखा होता. मार्क्सने पूर्वींच्या समाजवादी विचारवंतांना अद्‌भुत आदर्शवादी म्हणून संबोधिलें; आणि आपण समाजवादाचें शास्त्र सांगत असल्याचा दावा केला. त्याची इतिहासविषयक दृष्टि शास्त्रीय होती खरी. पण त्याने आर्थिक नियतिवादावर जो भर दिला त्यामुळे त्याच्या इतिहासवादाला विश्वहेतुवादाचें ( Teleology ) स्वरूप आलें. आणि त्याचा असा अर्थ होऊं लागला कीं समाजवादी व्यवस्था ही माणूस अस्तित्वांत आणील असें नाहीं; उत्पादनशक्तींच्या कार्यामुळे त्यांचा परिणाम म्हणून समाजवाद आपोआप अपरिहार्यपणें अस्तित्वांत येईल; ऐतिहासिक विकासाचा तो आवश्यक अटळ परिणामच होय. इतिहासाच्या गतीचे नियम समजले म्हणजे भांडवलशाही पद्धति समाजवादास जन्म देईल असें खात्रीने भविष्य वर्तवितां येतें हाच मार्क्सवादी समाजवादाच्या शास्त्रीय वस्तुनिष्ठतेचा आधार बनला. आणि हे इतिहासाच्या गतीचे

नियम आपण शोधून काढले आहेत असा मार्क्सचा दावा होता. परंतु सामाजिक शास्त्रांच्या या न्यूटननंतर लापलास (Laplace) झाला नाही. उलट, मार्क्स हाच चुकीचा द्रष्टा असल्याचें सिद्ध झालें.

त्याचे अनेक अनुयायी समजतात त्याप्रमाणे मार्क्स हा कांही रूक्ष, गणितीपद्धतीने विचार करणारा इतिहासद्रष्टा नव्हे. तो एक भावनाशील मानवतावादी होता. क्रांतीवर त्याची जाज्वल्य निष्ठा होती, त्यामुळे त्याला अद्भुतभावरम्यतावादी म्हणतां येईल. क्रांति ही एक अद्भुतरम्य कल्पना आहे. कारण, आपण ज्या जगांत राहतों तें बदलण्याचें माणसाचें सामर्थ्य तिच्यांत गृहीत धरलें आहे. मानवी हेतुपूर्ण प्रयत्न विचारांत न घेतल्यास सामाजिक विकास हा एक यांत्रिक स्वरूपाचा विकासक्रमच बनतो. आणि आकस्मिक बदल किंवा प्रसंगविशेषीं वाढणारी गति हीं त्यांत बसूं शकत नाहीत. क्रांतीचा द्रष्टा या नात्याने मार्क्सला अद्भुतभावरम्यतावादीच म्हटलें पाहिजे. मानवी सर्जनशीलतेवर त्याचा विश्वास होता. वेळोवेळीं सामाजिक गतीचा वेग वाढवून माणूस क्रांति घडवून आणतो अशी त्याची श्रद्धा होती. तो मानवतावादी असल्यामुळे अत्यंत परिणामकारक स्वरूपाचें नैतिक आवाहन हीच त्याच्या क्रांतिविषयक सिद्धान्तामागील खरी शक्ति होती. वस्तुनिष्ठतेपासून न ढळणारे त्याचे टीकाकार देखील त्याच्या सत्यान्वेषण व बौद्धिक प्रामाणिकपणाबद्दल त्याचा गौरव करतात. त्याच्या ठिकाणीं अत्यंत जाज्वल्य

व श्रेष्ठ स्वरूपाची नैतिक तळमळ होती, सामाजिक अन्यायाविरुद्ध तीव्र चीड होती, तसें नसतें तर दलित आणि शोषित जनतेची परिस्थिति सुधारण्यासाठी त्याने जो एकाकी लढा दिला तो त्याला देतांच आला नसता.

ढोंग आणि भोंदूगिरी यांजविरुद्ध अत्यंत त्वेषाने मार्क्स लढला. या दृष्टीने त्याचें जीवन हें त्याच्या ( यहुदी ) वंशांतील प्राचीन ऋषींच्या जीवनपरंपरेप्रमाणेच अत्यंत नीतिमान् होतें. त्याची भांडवलशाहीवरील कठोर टीका काळजीपूर्वक पाहिल्यास त्या व्यवस्थेचा नैतिक धिक्कार हाच तिचा गाभा होय, असें म्हणावें लागेल. वास्तविकपणें ‘ कॅपिटल् ’ हा सामाजिक नीतिशास्त्राचाच ग्रंथ होय. श्रमजीवी जनतेच्या गुलामगिरीचा अत्यंत प्रभावी निषेध त्यांत व्यक्त झाला आहे. विषमता व अन्याय यांजवर आधारलेल्या प्रस्थापित व्यवस्थेचें उच्च पातळीवरून नैतिक समर्थन करणारांच्या भोंदूगिरीचा मार्क्स द्वेष करी. त्यामुळेच कदाचित् त्याने आपल्या आर्थिक सिद्धान्तामागील नैतिक आवाहन स्पष्ट करण्याचें मुद्दाम टाळलें असावेसें वाटतें. तथापि मार्क्सचा इतिहासावर घडलेला परिणाम हा त्याच्या नैतिक तळमळीचाच परिणाम होय. त्याचे कर्मठ अनुयायी मात्र या परिणामापासून सर्वस्वीं मुक्त असल्यासारखेच दिसतात.

मार्क्सवाद ही जरी एक सर्वंकष हुकुमशाहीची विचारसरणी झाली असली तरी स्वतः मार्क्स हा स्वातंत्र्याचाच पुरस्कर्ता

होता. आणि तो मानवतावादी असल्यामुळे व्यक्तीच्या स्वातंत्र्यावरच त्याचा भर होता. जेथे मनुष्य आपल्या सभोंवतालच्या परिस्थितीचा स्वामी बनतो असें " स्वातंत्र्याचें अधिराज्य " म्हणजे समाजवाद होय, असें त्याने म्हटलें आहे. अशा प्रकारचा मानवतावादी सिद्धान्त प्रतिपादन करणारा मार्क्स सामुदायिक अहंतेचा, मग ती अहंता कामगारवर्गरूपी का असेना, पूजक बनणें अशक्य होतें. मार्क्सच्या म्हणण्याप्रमाणे समाजवादी व्यवस्थेंत बुद्धीचा मानवी जीवनांत आढळणाऱ्या सर्व बुद्धिविरोधी शक्तींवर विजय होणार असून, बुद्धिनिष्ठ मानव हा आपल्या भवितव्याचा निर्माता बनणार आहे. म्हणून आर्थिक नियतीच्या तर्कदुष्ट कल्पनेपासून मुक्त झालेल्या मार्क्सवादाच्या मानवतावादी नैतिक प्रेरणेंतूनच आजची नवी श्रद्धा जन्म पावणार आहे. युगानुयुगें जो मानवी वारसा सांचत आला आहे त्याचा मार्क्सवादाची मानवतावादी प्रेरणा एक अविभाज्य भाग असून त्याच्यावर जे भविष्यकाळ घडविणार आहेत त्यांचा हक्क आहेच आहे.

मार्क्सवादांतील ग्राह्य मूल्यें हीं त्याच्या उदारमतवादी पार्श्व-भूमीवरच प्रतीत होतात. बर्न्सटाइनने मार्क्सवादांत सुधारणा करण्याचा यत्न केला असें म्हणणें चुकीचें आहे. मार्क्सवाद हा उदारमतवादाचाच स्वाभाविक तर्कशुद्ध विकास होय असें त्याने म्हटलें असून यामुळे मार्क्सवादाची उदारमतवादी पूर्वपरंपराच त्याने दाखवून दिली आहे. समाजवाद म्हणजे संघटित उदार-

मतवाद होय या त्याच्या म्हणण्यांतील तथ्य अजून अनेकांना आकलन व्हावयाचें आहे. उदारमतवादाने व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वाची घोषणा केली. परंतु उदारमतवादाच्या प्रत्यक्ष व्यवहारांत या तत्त्वाला केवळ औपचारिक स्वरूप प्राप्त होऊन तें नष्टप्राय झालें. समाजवादाने मात्र हें तत्त्व प्रत्यक्ष अंमलांत आणण्याचें प्रत्यक्ष अभिवचन दिलें.

मार्क्सवादाच्या या उदारमतवादी पूर्वपरंपरेचा त्यांतील आर्थिक सिद्धान्तांमध्ये स्पष्ट पुरावा मिळतो. “अर्थवादी मनुष्य” ही उदारमतवादांतील कल्पना आहे. मार्क्सने इतिहासाची जी आपली अशी विशिष्ट उपपत्ति लाविली आहे ती याच कल्पनेंतून सुरू होते. श्रममूल्यसिद्धान्त ही मार्क्सवादी अर्थशास्त्रांतील मूलभूत कल्पना होय. आणि हा सिद्धान्त मार्क्सने रिकार्डोपासून घेतला आहे. अतिरिक्त मूल्याचा सिद्धान्त हें श्रममूल्य-सिद्धान्तापासूनच काढलेलें तर्कशुद्ध अनुमान होय. ही अतिरिक्त मूल्याची कल्पना देखील ग्रे, हॉज्स्किन्, थॉमसन् इत्यादि जुन्या आंग्ल समाजवाद्यांनाहि सुचली होती. एकूण, मार्क्सने ज्या इंग्लिश रूढ अर्थशास्त्राच्या सिद्धान्तांवर जोराचा हल्ला चढविला त्यांतून त्याने बऱ्याच कल्पना उचलल्या होत्या, हें नाकारतां येणार नाही. जुन्या विचारसरणींतील तर्कदुष्टता काढून टाकून ती शुद्ध स्वरूपांत नव्या तात्त्विक रचनेचा आधार बनविणें हें त्याचें उद्दिष्ट होतें. या दृष्टीने मार्क्सची टीका ही खरीखुरी विधायक टीकाच

होय. बहुतेक माणसांचे विचार व कल्पना त्याच्या नेहमींच्या नित्य व्यवसायामुळेच अवश्यमेव बनत असतात, असें मत ॲडाम स्मिथनेहि व्यक्त केलें होतें. माणसांचे विचार त्यांनी आपला चरितार्थ चालविण्यासाठीं उपयोगांत आणलेल्या साधनांनीच निर्णीत होतात, हें जें मार्क्सवादी तत्त्व त्या तत्त्वाचा अशा प्रकारें मार्क्सच्या पूर्वीच भांडवलशाही अर्थशास्त्राच्या पित्याने उच्चार केला होता, असें म्हणतां येतें.

नैतिक प्रश्नासंबंधीची मार्क्सवादी मनोवृत्ति देखील भांडवलशाहींतील उपयुक्ततावादाच्या परंपरेशीं जुळणारी होती. भावनाप्रधान आणि त्यागावर आधारलेलें नैतिक वर्तन हें उमराववर्गांत जन्माला आलें असून भिन्न सामाजिक व सांस्कृतिक वातावरणांत तें स्वीकारण्यासारखें नाही, असें मत बेंथॅमने व्यक्त केलें होतें. परंतु " मूलगामी तत्ववेत्त्यां "-( Philosophical Radicals )नी नैतिक प्रश्नाचा व्यक्तीच्या दृष्टिकोणांतून विचार केला. सामाजिक कल्याणासाठीं व्यक्तीस आपल्या हिताचा त्याग करावयास सांगण्याच्या कल्पनेंतील नैतिकता त्यांना विवाद्य वाटली. आज्ञाधारकपणा व नम्रता या जुन्या सद्गुणांवर त्यांचा विश्वास नव्हता. त्या ऐवजीं व्यक्तीचे हक्क आणि हितसंबंध यांचें रक्षण केल्यानेच सर्वांची समृद्धि व कल्याण साधतां येतील असें त्यांचें मत होतें. परस्पर हितसंबंधांतील समतोलपणांतूनच नैतिक व्यवस्था जन्मास येते, असें त्यांचें प्रतिपादन होतें. आपल्या मानवतावादी दृष्टिकोणाशीं येणारा

विरोध पतकरून मार्क्सने ही व्यक्तिस्वातंत्र्याची विमोचक कल्पना भांडवलशाहींतील एक अव्यक्त विचार म्हणून त्याज्य ठरविली.

हेगेलच्या प्रभावामुळे नैतिक प्रश्नाबाबतचा व्यक्तिनिष्ठ दृष्टिकोण सोडावयास मार्क्स प्रवृत्त झाला. उपयुक्ततावाद्यांचा नैतिक सापेक्षतावाद हा बुद्धिवादावर आधारलेला होता. याउलट, मार्क्सवादांतील सापेक्षतावाद दिसायला जरी बुद्धिवादी दिसला तरी त्याचें स्वरूप आग्रही आहे. हेगेलचा नैतिक वास्तवतावादच (Positivism) भविष्यकाळाला लागू करावा, असें त्याचें स्वरूप आहे. 'बळी तो कान पिळी' हेंच विधान सिद्ध करण्यासाठीं हेगेलने अनीतीला बुद्धिवादाचा पेहेराव चढविला. नैतिक गमक किंवा कसोटी म्हणून कांही नाही; जे अस्तित्वांत आहे तें योग्य, म्हणून इष्ट किंवा चांगलें होय, अशी हेगेलची वास्तवानुसारी नैतिक विचारप्रणालि आहे. ती म्हणजे शुद्ध नीतीच्या मुळावरच आलेला नैतिक शून्यवाद होय. हेगेलचा वास्तववादी नैतिक सिद्धान्त आणि मार्क्सवादांतील नैतिक सापेक्षतेची कल्पना यांत फरक नाही. आजचा वर्तमानकालीन सत्ताधीश हा नीतिमानच होय, अशी हेगेलची विचारसरणी होती. हीच विचारसरणी भविष्यकाळाला लागू करून मार्क्सने सांगितलें कीं भावी काळांतील येणारा सत्ताधीश हा सुद्धा नीतिमानच असला पाहिजे. वर्तमान वस्तुस्थिति ही योग्य असते म्हणून ती नैतिक होय, असें हेगेल म्हणतो. मार्क्सने त्यांत भर घातली कीं "जी

हल्ली वस्तुस्थिति आहे, त्यांतूनच मला दिसत असलेला भविष्य-काळ अपरिहार्यपणें उद्भवणार. तस्मात् त्या भविष्यकाळीं देखील जी जी वस्तुस्थिति असेल ती ती योग्य म्हणजे नैतिकच असेल." म्हणजे आज जर सत्ताधीश हा नीतिमानच असणार असें असेल तर भविष्यकाळांतहि तसेंच असलें पाहिजे. मार्क्सने पाहिलेलें हें भविष्य म्हणजे सत्तारूढ साम्यवादाचा वर्तमानकाळ होय. अशा प्रकारें मार्क्सवादाची नैतिक प्रश्नाबाबतची दृष्टि परिस्थितिसापेक्ष बनली आहे.

मार्क्सवादाचा हा हेगेलवादी अंतःस्थ गाभा एका देशांत सत्तारूढ झालेल्या साम्यवादाच्या अनुभवामुळे नग्न स्वरूपांत उघड झाला आहे. त्यांच्या मतें सामान्यतः तेथें आज जी वस्तु-स्थिति आहे ती योग्यच आहे. नव्या समाजरचनेचें रक्षण कर-ण्यास जें जें आवश्यक तें तें नैतिक, म्हणून बल हेंच युक्त, असें मानण्यांत येऊं लागलें आहे. हा हेगेलचा वास्तववादी नैतिक दृष्टिकोण साम्यवादी राजवट असलेल्या रशियापुरताच मर्यादित आहे असें नाही; जगांतील सर्वच साम्यवादी पक्षांत तो आढळतो. याचाच परिणाम म्हणजे साम्यवादी चळवळीचा झालेला अधः-पात हा होय. यामुळे आजच्या जर्जर आणि विस्कळित अशा प्रस्थापित व्यवस्थेविरुद्ध बंड करणाऱ्या इतरांना साम्यवादाचें आकर्षण वाटेनासें झालें आहे. त्याबरोबरच सामाजिक न्यायावर आधारलेल्या नवसमाजनिर्मितीसाठीं प्रयत्न करणाऱ्या बंडखोर

लोकांची संख्या सारखी वाढत आहे. ते सर्व वर्गांत आणि विशेषत: कामगारांव्यतिरिक्त मध्यम श्रेणीच्या लोकांत आढळतात. मार्क्सने सांगितल्याप्रमाणे समाजशक्तींची दोनच विरोधी प्रमुख गटांत विभागणी झालेली नाही. त्यामुळे क्रांतीचें स्वरूप त्याने सांगितलेल्या प्रकाराचें राहणें शक्य नाही.

विरोधविकासपद्धतीच्या पडलेल्या मोहामुळे मार्क्सला हेगेलचा प्रभाव दूर सारून पुढें जातां आलें नाही. क्रांतीच्या तत्त्वज्ञानाचें अत्यंत प्रभावी आवाहन म्हणजे त्यांतील नैतिक क्रांतिवाद; त्या वादापासून मार्क्स च्युत झाला. मार्क्सवादाचा हा जो मूळ गाभा त्याचा त्याच्या परंपरावादी भाष्यकारांना पूर्णपणें विसर पडला. आणि त्यामुळे त्यांनी आपल्या राजकीय श्रद्धेचा जेझुइटांप्रमाणे दुराग्रही अंधसंप्रदाय बनविला आहे.

---

## क्रान्तीचें मार्क्सवादी तत्त्वज्ञान

## : ५ :

शिलकीचें ( वा अतिरिक्त मूल्याचें) उत्पादन हें भांडवलशाही अर्थव्यवस्थेचेंच एक वैशिष्टय होय, आणि तें कामगारांचें आर्थिक शोषण होत असल्याचें प्रमाण होय, हा मार्क्सवादी अर्थशास्त्राचा सिद्धान्त केवळ मार्क्सवादांतीलच नव्हे तर सगळया क्रांतीच्या तत्त्वज्ञानांतील एक मूलभूत तर्कदुष्ट कल्पना होय. आपल्या श्रमाचें पुरेपूर माप पदरांत न पडणें हें कांही भांडवलशाही अर्थव्यवस्थेचेंच वैशिष्टय नव्हे. आपल्या श्रमाने उत्पन्न केलेली संपत्ति सर्वच्या सर्व न उपभोगतां तिचा कांही भाग तरी शिल्लक ठेवणें यावरच मानवी संस्कृतीच्या आरंभापासून आजवर झालेली सर्व प्रगति आणि विशेषत: उत्पादनसाधनांची वाढ आधारलेली आहे. उत्पादित संपत्तीचें उपभोग्य संपत्तीपेक्षा अधिक प्रमाण असणें हा सगळया सामाजिक प्रगतीचा आधार आहे. सर्वकालीन परिस्थितीला हें विधान लागू करतां येण्यासारखें आहे. मार्क्सवादाच्या आर्थिक परिभाषेंत ज्याला ‘ अतिरिक्त मूल्य ’ म्हणतात तो भांडवलशाहींतील सामाजिक “ वधारा ” होय.

आर्थिक जीवनाच्या मार्क्ससारख्या सूक्ष्म अभ्यासकाच्या नजरेंतून सामाजिक " वधाऱ्याचें " किंवा अतिरिक्त मूल्याचें हें वैशिष्ट्य निसटूं शकलें नाही. त्याची सामाजिक प्रगतीच्या दृष्टीने गरज आणि महत्त्व त्याला नाकारतां आलीं नाहीत. आर्थिक दृष्टीने अतिरिक्त मूल्य नाहीसें करण्याची मागणी अव्यवहार्य, किंबहुना, आत्मघातकीपणाचीच म्हटली पाहिजे. तसें झाल्यास सामाजिक प्रगति ज्या शिलकी संपदेवर अवलंबून असते तें शिलकी मूल्यच नाहीसें होईल. अशा प्रकारें प्रगतीची प्रेरकशक्तीच नाहीशी झाल्यास सामाजिक प्रगति स्थगित होईल आणि अखेरीस समाजरचनाच मोडून पडेल. हें सामाजिक शिलकी मूल्य कमी पडल्यामुळे किंवा अजिबात लोपल्यामुळे प्राचीनकाळच्या अनेक संस्कृती लयाला गेल्या आहेत.

आपला आर्थिक सिद्धान्त पुढे मांडतांना मार्क्सने भांडवलशाही अर्थव्यवस्थेचें महत्त्वाचें उद्दिष्ट अतिरिक्त मूल्य निर्माण करणें हें होय, असें म्हटलें आहे. वरील सिद्धान्त मांडतांना अतिरिक्त मूल्य नाहीसें करण्याची कल्पना स्पष्ट शब्दांत त्याने मांडली नाही. तथापि कामगारवर्गाचें आर्थिक शोषण बंद करावयाचें झाल्यास तें अतिरिक्त मूल्य नष्ट करणें ओघानेच प्राप्त होतें. आर्थिक सिद्धान्तावरून सरळ तर्कशुद्ध अनुमान काढून अतिरिक्त मूल्य नष्ट करण्याची कल्पना पुढे मांडण्याऐवजी मार्क्सने राजकीय सिद्धान्तांच्या द्वारें ती अप्रत्यक्षपणे सूचित केली

आहे. सामाजिक अतिरिक्त मूल्याच्या उत्पादनांत कामगारांची “ पिळवणूक ” दिसून येत असली तर ती उत्पादक कामगाराला आपल्या श्रमाचें पुरेपूर मूल्य मिळत नाही याच अर्थाने होय, ही गोष्ट मार्क्सने नजरेआड केली. त्याचप्रमाणे कोणत्याहि अर्थ-व्यवस्थेंत, जर ती कोंडून नष्ट व्हावयाची नसेल तर, अशा प्रकारचें उर्वरित उत्पादन आवश्यक आहे, याकडेहि त्याने फारसें लक्ष दिलें नाही. भांडवलशाही अर्थव्यवस्थेंत हें अतिरिक्त मूल्य हें एका विशिष्ट वर्गाच्या ताब्यांत जातें व म्हणून तें आर्थिक शोषणाचें द्योतक होय, असा मार्क्सने निष्कर्ष काढला. व या तर्क-दुष्ट सिद्धान्ताच्या आहारीं जाऊन त्याने अशी मागणी केली कीं अतिरिक्त मूल्य एका वर्गाच्या ताब्यांत जाण्याची ही पद्धत बंद झाली पाहिजे. शोषण करणारांच्या हातची संपत्ति काढून घेतली पाहिजे तरच माणसाचें माणसाकरवी होणारें आर्थिक शोषण बंद होऊं शकेल.

एका वर्गाच्या हातीं उर्वरित संपत्ति जाण्याची पद्धति ही अनिष्ट खरीच. आणि ती बंद होणेंहि आवश्यक आहे. परंतु या मागणीचें अधिष्ठान आर्थिक नसून नैतिक आहे. ती सामाजिक न्यायाची मागणी आहे. तथापि मार्क्सवादी क्रांतितंत्रांत ही गोष्ट बसूं शकत नाही. मार्क्सवादी अर्थशास्त्र आणि क्रांतीचें तत्त्वज्ञान यांतील हेत्वाभास प्रत्यक्ष अनुभवाने आता उघड झाले आहेत. समाजवादी अर्थव्यवस्थेंत देखील सामाजिक अतिरिक्त

मूल्य निर्माण होणारच अशी मार्क्सवाद गर्भित कबुली देतो. समाजवादाची स्थापना करण्यासाठीं कामगारांनी शोषण करणारांची संपत्ति काढून घ्यावी असें मार्क्सवाद निक्षून सांगतो. याचाच अर्थ असा कीं नव्या व्यवस्थेंत राज्यविहीन व वर्गविहीन समाजाचें स्वप्न प्रत्यक्षांत येईपर्यंत सामाजिक उर्वरित संपत्तीवर एकाच कामगारवर्गाचा ताबा राहणार !

प्रत्यक्षांत आलेल्या अनुभवामुळे क्रांतीच्या या तर्कदुष्ट तत्त्व-ज्ञानाचा आता त्याग करणें जरूर आहे. रशियांतील समाजवादी अर्थव्यवस्थेंत देखील शिलकीचें वा अतिरिक्त मूल्याचें उत्पादन होतच आहे. नाहीतर तेथील ज्या औद्योगीकरणाच्या कार्यक्रमाचें एवढें कौतुक व गाजावाजा केला जातो त्याची उपपत्ति लागणार नाही. औद्योगीकरणाची मूलभूत गरज भांडवल; आणि उत्पाद-कांनी निर्माण केलेली संपत्ति सर्वस्वी उपभोगांत आणावयाची म्हटल्यास भांडवलनिर्मितीच अशक्य आहे. तात्पर्य, शिलकीच्या वा अतिरिक्त मूल्याच्या आधारेंच हें औद्योगीकरण शक्य झालें आहे. तातडीने औद्योगीकरण करावयाचें म्हटलें म्हणजे कितीतरी अधिक भांडवलाची निर्मिति होणें आवश्यक ठरतें. याचाच अर्थ असा कीं अधिक व्यापक प्रमाणांत शिल्लक वा अतिरिक्त मूल्य निर्माण झालें पाहिजे. अतिरिक्त मूल्यनिर्मिति ही जर कामगारांच्या आर्थिक शोषणाची द्योतक असेल तर समाजवादी अर्थव्यवस्थेंत देखील हें शोषण कायम राहतें असें म्हणावें लागेल. आणि

रशियांतील समाजवादी अर्थव्यवस्थेंत तर हें शोषण कितीतरी अधिक प्रमाणांत होत आहे असें म्हणावें लागेल. कारण तेथे फारच मोठ्या प्रमाणावर अतिरिक्त मूल्याचें उत्पादन करून भांडवल संचित करण्यांत आलें आहे.

वरील विवेचनावरून दोन अनुमानें निघूं शकतात. एकतर क्रांतीशीं प्रतारणा झाली आहे असें ट्रॉट्स्कीप्रमाणे तरी म्हटलें पाहिजे, नाहीतर समाजवाद म्हणजे एकप्रकारची राज्याधिष्ठित भांडवलशाहीच होय, हें मान्य केलें पाहिजे. तथापि क्रांतीशीं प्रतारणा झाली आहे असें म्हणतां येत नाही. मार्क्सवादाच्या तात्त्विक सिद्धान्ताबरहुकूमच क्रांतीची वाटचाल होत आहे. लेनिनने आपल्या समजुतीप्रमाणे मार्क्सवादी तात्त्विक सिद्धान्तांचा अर्थ लावला. आणि या अर्थावरूनच क्रांतीच्या विधायक व्यवहारी आचरणाचें स्वरूप निश्चित केलें. म्हणून क्रांतीची प्रतारणा झालेली नाही. मार्क्सचें शब्दप्रामाण्य स्वीकारून लेनिन आणि स्टालिन यांनी त्यांत भर घालून बनविलेल्या नवमार्क्सवादा-नुसारच क्रांतीचा आविष्कार होत गेला आहे. मार्क्सवादांतील दोष व अपुरेपणा अशा रीतीने प्रत्यक्ष अनुभवाने सिद्ध झाला आहे. त्यांतून नव्या क्रांतिकारक तत्त्वज्ञानाचा मार्ग उजळविण्याची प्रेरणा निर्माण होत आहे.

अतिरिक्त मूल्याचा तर्कदुष्ट सिद्धान्त आणि तें अतिरिक्त मूल्य जो वर्ग बळकावून बसला त्याचा प्रत्यक्ष अनुभव यांतून वर्गकलहा-

च्या आग्रही सिद्धान्ताला तात्त्विक अधिष्ठान मिळाल्यासारखें झालें. अर्थात् मार्क्स व त्याचे निष्ठावंत अनुयायी यांनी आर्थिक नियतिवादावरील श्रद्धेमुळे वर्गकलहाची ही कल्पना सगळयाच इतिहासाला अगदी मानवी संस्कृतीच्या आरंभापासून लागू करण्याचा प्रयत्न केला. यामुळे संस्कृतीचा इतिहास म्हणजे वर्गकलहाचा इतिहास होय, हें प्रमेय मार्क्सने पुढे मांडलें. समाजांत सर्वकाळीं निरनिराळे वर्ग आढळतात आणि त्यांच्या हितसंबंधांतहि विरोध दिसून येतो हें खरें आहे. तथापि त्याबरो-बरच समाजाची धारणा करणारी, सर्वांना एकत्रित ठेवणारी प्रवृत्तीदेखील इतिहासांत आढळते. या प्रवृत्तीवांचून समाजव्यवस्था वेळोवेळीं विस्कळित होऊन गेली असती; सामाजिक क्रांतीचा संभवच शिल्लक राहिला नसता. आधुनिक भांडवलशाही समाजाची विभागणी, मार्क्सने भाकित केलें होतें तशी, दोन विरोधी वर्गांत झालेली आढळून येत नाही. त्यामुळे वर्गकलहाच्या सिद्धान्ता-विषयी संशय निर्माण झाला आहे. जुन्या इतिहासाला लावून दाखविलेल्या मार्क्सवादी उपपत्तीबद्दल बोलावयाचें तर कोणत्याहि पूर्वकल्पित तात्त्विक सांच्यांत थोड्याशा बुद्धिचातुर्याने घटना बसवितां येतात इतकेंच म्हणतां येईल.

भांडवलशाही अर्थव्यवस्थेंतील मध्यमवर्गाच्या स्थानाविषयीचें मार्क्सवादाचें निदान हें निःसंशय चुकीचें आहे. मध्यमवर्ग हा कालांतराने नाहीसा होईल ही अपेक्षा इतिहासाने खरी ठरविली

नाही. उलट, पहिल्या महायुद्धानंतर निर्माण झालेल्या आणीबाणी-च्या परिस्थितींत मध्यमवर्गाचें बौद्धिक व राजकीय महत्त्व निर्णायक ठरलें आहे. उत्पादनसाधनांची मालकी मूठभर लोकांच्या हातीं केंद्रित झाल्यामुळे मध्यमवर्गाची वाढ होणें आवश्यक झालें. शिवाय ज्यांना भांडवलशाही पद्धतीचें आर्थिक शोषण करतां येत नाही ते सगळे कामगार झाले असेंहि नाही. आर्थिक-दृष्ट्या कदाचित् त्यांचें तसें वर्णन करतां येईल. परंतु निर्णायक स्वरूपाच्या सांस्कृतिक व शैक्षणिक क्षेत्रांत त्यांचें स्वतंत्र व महत्त्व-पूर्ण अस्तित्व कायम असून त्याचा परिस्थितीवर परिणाम होताना दिसून येतो. वस्तुत: एका बाजूला भांडवलदार आणि दुसऱ्या बाजूला कामगार या दोहोंमध्ये हा मध्यमवर्ग संख्येने सतत वाढत असून प्रस्थापित व्यवस्थेला विरोध करण्याचें त्याचें सामर्थ्य दिसून येत आहे.

समाजवाद ही खरोखर मध्यमवर्गाचीच विचारसरणी होय. भांडवलदार आणि कामगार या दोन्ही परस्परविरोधी शक्तींपासून भिन्न असलेला असा हा वर्ग आहे. त्याची बौद्धिक वाढ पुरेशी झालेली आहे. म्हणूनच तात्पुरत्या हितसंबंधांतून निर्माण झालेल्या कलहापलीकडे पाहूं शकणाऱ्या व्यक्ती या वर्गातून पुढे येऊं शकल्या, आणि अशा व्यक्तींनाच सामाजिक न्याय व संवादित्व यांजवर आधारलेलें नवें समाजजीवन निर्माण करणें शक्य आहे ही कल्पना करतां आली. भांडवलशाहीच्या उतरत्या काळांत मध्यमवर्गाचें

आर्थिक दृष्ट्या अत्यंत नुकसान झालें. यामुळे प्रस्थापित व्यवस्था उलथून टाकण्याची त्याची इच्छा बळावली; कारण त्या व्यवस्थेंत त्याला स्थान नव्हतें. नव्या व्यवस्थेची गरज अशा प्रकारें मध्यम-वर्गाला वाढत्या प्रमाणांत वाटूं लागली. अशा रीतीने आर्थिक दृष्टीने नागावलेला मध्यमवर्ग हा कामगारांच्या जोडीने समाज-वादाच्या स्थापनेसाठीं उभा राहिला. अर्थात् या मध्यमवर्गाच्या दृष्टीने समाजवाद म्हणजे राज्याधिष्ठित भांडवलशाही असा त्याचा अर्थ नव्हता. समाजवाद म्हणजे एक अधिक न्याय्य स्वरूपाची समाजव्यवस्था होय, अशीच त्याची कल्पना होती. सांस्कृतिक दृष्ट्या मात्र मध्यमवर्गीय हे कामगार झाले नाहीत. सांस्कृतिक व नैतिक मूल्यें हीं मानवी संस्कृतीचा उत्तम परिपाक होत, हें जाणण्याची कुवत त्यांच्या ठिकाणीं होती. म्हणून आर्थिक नियतिवादाच्या क्रांतिवादी विधात्यापुढे या मूल्यांचें बलिदान करण्याची त्यांची तयारी नव्हती. याचा परिणाम म्हणून क्रांति-कारक शक्तींमध्ये दुफळी झाली. आग्रही मार्क्सवादाने आर्थिक विचारांना अग्रस्थान दिलें आणि सांस्कृतिक व नैतिक मूल्यां-विषयी अश्रद्धा व संशयवृत्ति बाळगली. यामुळे मध्यमवर्ग मार्क्सवादापासून विन्मुख झाला आणि क्रांतिवादी शक्तींमध्ये बौद्धिक दौर्बल्य निर्माण झालें. स्वार्थी अर्थवादाने समाजवादाच्या नैतिक प्रेरणेवर मात केली.

मध्यमवर्गाची उपेक्षा करण्यांतील दोष व धोका लेनिनच्या ध्यानांत आला होता. ही चूक सुधारण्याचा त्याने प्रयत्नहि केला. पण तो केवळ संघटनेच्या क्षेत्रांत! तात्त्विक दृष्ट्या मार्क्सवादी जगांत कामगारवर्ग हाच श्रेष्ठ स्थानीं राहिला. परंतु क्रांतिकारक पक्षाच्या संघटनेचा विचार करतांना कामगारांच्या ठिकाणीं सामाजिक लोकशाहीस्थापनेची जाणीव आपोआप निर्माण होणार नाही; ती निर्माण करण्याचे प्रयत्न बाहेरून मध्यमवर्गीय बुद्धिवाद्यांच्या द्वाराच केले पाहिजेत हें लेनिनने मान्य केलें. हें महत्त्वपूर्ण मत पुढे मांडीत असतांना लेनिन याच्याहि पुढे जाऊन 'कामगारवर्ग आपण होऊन समाजवादी बनणार नाही, तो ट्रेड-युनिअनवादी बनेल' असेहि उद्गार काढले. यामुळे एका बाजूला मार्क्सवादी आर्थिक उपपत्ति आणि दुसऱ्या बाजूला कामगार हाच नव्या जगाचा निर्माता होय हा सिद्धान्त, या दोहोंमध्ये अंतर्विरोध निर्माण झाला.

लेनिनने आपला सिद्धान्त सार्वत्रिक लावूं पाहिला. केवळ रशियांतच नव्हे तर जगांत सगळीकडेच कामगारवर्गाला आपली स्वतंत्र विचारसरणी निर्माण करणें अशक्य आहे. भांडवलदार किंवा समाजवादाचा बुद्धिनिष्ठ पुरस्कार करणारा मध्यमवर्ग यां-पैकीं कोणाचें तरी अनुसरण तो करीत असतो. समाजवादाचें ध्येय आणि कामगारवर्गाच्या क्रांतीचा सिद्धान्त या दोन्हीहि गोष्टी कामगारवर्गाच्या अनुभवांतून उद्भवल्या नसून त्यांची कल्पना व

घडण मध्यमवर्गीय बुद्धिमंतांनीच केली आहे, याची ही स्पष्ट कबुलीच होय. मध्यमवर्गाच्या भावना व विचार हे, मार्क्सवादाप्रमाणे म्हणावयाचे तर, त्या वर्गाच्या जीवनविषयक अनुभवांतूनच निर्माण झाले पाहिजेत ! म्हणून समाजवाद आणि क्रांतीच्या बाबतींत कामगारवर्गाचें माजवलेलें अवास्तव स्तोम असमर्थनीयच होतें हें उघड आहे. परंपरागत मार्क्सवादी विचारसरणीने मध्यमवर्गाची वेळीं अवेळीं नालस्ती व संपूर्ण उपेक्षा केली असली तरी तात्त्विक क्षेत्रांतील खरें श्रेय त्याच वर्गाला दिलें पाहिजे.

लेनिनने संघटनेच्या क्षेत्रांत एक अत्यंत मोठी चूक दुरुस्त केली असली तरी तात्त्विक दृष्ट्या परंपरागत मार्क्सवादाचेंच त्याने अगदीं कट्टर समर्थन केलें. कामगारवर्गाच्या वैचारिक क्षेत्रांतील मर्यादा त्याने स्पष्ट केल्या खऱ्या, पण त्या अगदीं वेगळयाच हेतूने. तो हेतू म्हणजे पक्षसंघटनेचें स्थान व महत्त्व प्रतिपादन करणें हा होय. कामगारवर्गांत समाजवादी विचार नेण्याचें कार्य हें मध्यमवर्गीय बुद्धिवाद्यांचें कार्य होय. म्हणून कामगारपक्ष हा ‘ धंदेवाईक ’ क्रांतिकारकांचाच पक्ष असला पाहिजे ही कल्पना निघाली. अर्थात् अशा प्रकारचे ‘ धंदेवाईक ’ क्रांतिकारक हे मध्यमवर्गांतूनच येणें स्वाभाविक होतें. असें असूनहि तात्त्विक दृष्टीने लेनिनने मध्यमवर्गाचें क्रांतिकारक महत्त्व मान्य केलें नाही. कामगारवर्गाचें त्याने जें वास्तववादी मूल्यमापन केलें त्याचा परिणाम मात्र असा झाला कीं त्या वर्गावर त्याच्या

प्रतिनिधित्वाचा दावा करणारी पक्षसंघटना लादली गेली. कामगारांचा पक्ष हा कामगारवर्गाचा भाग किंवा अंश नव्हे; या पक्षाने स्वत: कामगारवर्गाचा काल्पनिक अहंकार आत्मसात् करून स्वत:ला त्या वर्गाचा स्वयंमन्य नेता मानलें. या ' नेतृत्व-तत्त्वाचा ' नंतर फॅसिस्टांनी भरपूर उपयोग करून घेतला. पुढे साम्यवादी चळवळींत ज्या कल्पनेला एका धर्माज्ञेचें स्थान प्राप्त झालें त्या कल्पनेला तात्त्विक अधिष्ठान देणारा लेनिन, कट्टर आग्रही लेनिन होय.

आर्थिक नियतिवाद खरा धरावयाचा तर कामगारवर्ग हा बौद्धिक व सांस्कृतिक दृष्ट्या सर्वांहून अधिक मागासलेला वर्ग असणार. समाजवादाच्या स्थापनेनंतरच त्याची आर्थिक परिस्थिति सुधारणार आणि त्याच्या बौद्धिक व सांस्कृतिक विकासाची शक्यता निर्माण होणार. मार्क्सवादाच्या तात्त्विक भूमिकेंतून हा तर्कशुद्ध निष्कर्ष निघतो पण हा निष्कर्ष न मानतां मार्क्सवाद नव्या संस्कृतीच्या निर्मितीसाठीं समाजाचें नेतृत्व स्वीकारण्याची जबाबदारी कामगार-वर्गाकडे सोंपवितो. यांतील अंतर्विरोध अगदीं स्पष्ट आहे. आणि या तात्त्विक अंतर्विरोधामुळे साम्यवाद्यांचें आचरण अगदीं दोष-ग्रस्त झालें आहे. त्या दोषांचा परिहार करावयाचा त्यांनीं एक मार्ग शोधून काढला आहे. तो असा कीं मध्यमवर्गीय बुद्धि-मंतांनीच कामगारवर्गाच्या बौद्धिक व सांस्कृतिक पातळीपर्यंत उतरावे. पक्षाच्या नेतृत्वाची ही किंमतच होय.

## क्रान्तीचें मार्क्सवादी तत्त्वज्ञान

साम्यवादी चळवळींत बौद्धिक स्वातंत्र्याचा अभाव आहे. आपल्या कामगारवर्गीय स्वरूपाचा ही चळवळ अभिमान बाळगते. संस्कृति व नीति ही " भांडवलदारी " म्हणून अशांचा काय उपयोग ? परंतु अजून तरी दुसरी संस्कृति व नीति अस्तित्वांतच नाही. कामगारसंस्कृति हा एक ' वदतो व्याघात ' आहे. कामगारनीतीचें मूलभूत तत्त्व म्हणजे ' युद्ध आणि प्रेम यांत कशालाच विधिनिषेध नसतो ' हें होय. कामगारवर्ग तर युद्धाच्या ऐन धुमश्चक्रींत सांपडला आहे. म्हणून अशा वेळीं कोणतीहि साधनें पुनीतच होत. त्यांनी साध्य गांठलें म्हणजे झालें. साम्यवादी पक्ष हा नीतिअनीतीच्या विधिनिषेधाच्या पलीकडे आहे. आणि सांस्कृतिक मूल्यांवर त्याची श्रद्धा नाही. उलट, उच्चतर संस्कृति आणि व्यापक स्वातंत्र्य यांवर आधारलेल्या नव्या व्यवस्थेची उभारणी करण्यासाठीं आजच्या जगाची धडपड आहे. मानवी संस्कृतीचा ठेवा टिकवून त्याच्या आधारावर नवी उभारणी करावयाची धडपड आधुनिक जग करीत आहे. त्या आधुनिक जगाला साम्यवाद हा स्फूर्तिदायक नेतृत्व देऊं शकत नाही. नैतिक अरिष्टांत सांपडलेलें आधुनिक जग निरनिराळ्या प्रश्नांकडे अधिक बुद्धिनिष्ठ दृष्टीने पाहणाऱ्या नव्या नेतृत्वाची अपेक्षा करीत आहे. मार्क्सवादापेक्षा उच्च तत्त्वज्ञानाची त्याला आज गरज आहे.

कामगारवर्गामध्ये मूलतःच अंगभूत अशी क्रांतिकारक शक्ति नाही. नवसमाजनिर्मितीच्या ध्येयाचें त्याला आकर्षण वाटेलहि;

परंतु बौद्धिक व सांस्कृतिक मागासलेपणामुळे तो वर्ग या नात्याने विशेष दूरचा विचार करूं शकत नाही. आरंभी मार्क्सवादाने ही वस्तुस्थिति ध्यानांत घेतली होती. आणि क्रांतीची ऐतिहासिक आवश्यकता कामगारांतील कांही वर्गजागृत बिनीच्या शिलेदारांनाच वाटेल आणि म्हणून क्रांतिकारक पक्ष हा अशा बिनीच्या शिलेदारांचाच बनला पाहिजे असें त्यांतील प्रतिपादन होतें. वर्गकलहांत तडजोड उपयोगी नाही अशी आग्रही निष्ठा आणि समाजाची केवळ आर्थिक हितसंबंधांनीच प्रेरित झालेल्या दोन वर्गांत विभागणी होणार ही खोटी आशा, यामुळे मार्क्स व लेनिन– विशेषत: लेनिन–यांनी आपणासमोर एक क्रांतीचें चित्र उभें केलें. कामगारवर्गाचे हे बिनीचे शिलेदारच उठावणी करून क्रांति घडवून आणतील आणि जनतेवर हुकूमशाही स्थापन करतील असें तें चित्र होतें. परंतु या सिद्धान्तामुळे मूळ हेतूच नष्ट होतो हें रशियाच्या अनुभवावरून स्पष्ट झालें आहे. राजकीय हुकूमशाही, सांस्कृतिक हडेलहप्पी आणि आर्थिक गुलामगिरी यांवर आधारलेली नवी पद्धत तेथे अस्तित्वांत आली आहे. रशियाबाहेरील अनुभवहि निराळा नाही. रशियांतील क्रांतीच्या आकस्मिक विजयानंतर जगांत सगळीकडे क्रांति पराभूतच झाली. यामुळे या क्रांतीच्या तंत्राचा सत्ता हस्तगत करण्याच्या दृष्टीने अपुरेपणाच सिद्ध झाला.

वैज्ञानिक शोधांमुळे मार्क्सनंतरच्या काळांत प्रस्थापित सत्तेच्या हातीं असणारीं जुलमाचीं साधनें व लष्करी सामर्थ्य यांत अतो-

नात वाढ झाली आहे. यामुळे अल्पसंख्यांकांच्या उठावणीची कल्पना आतां अव्यवहार्य व टाकाऊ बनली आहे. साम्यवाद्यांची विचारसरणी वर्गीय आहे. आणि कामगार-हुकूमतस्थापनेशिवाय त्यांच्याजवळ दुसरा कांहीच तोडगा नाही. त्यामुळे सर्व प्रगमन-शील आणि क्रांतिकारक शक्तींना एकत्र आंदोलनांत आणण्याच्या कार्यांत साम्यवादी अपेशी ठरले आहेत. आणि साम्यवाद हा एक दुराग्रही वृत्तीचा पंथ बनला आहे. कामगारवर्गामध्ये देखील सांस्कृतिक दृष्ट्या पुढारलेले कामगार साम्यवादाकडे आकर्षित न होतां जुन्या सोशल डेमोक्रॅटिक पक्षांनाच चिकटून आहेत. यामुळे समाजांतील सर्वांत मागासलेल्या गटांनाच काय तें मार्क्सवादी क्रांतीचें आकर्षण शिल्लक उरलें आहे. शेवटीं तर बेकार आणि असंघटित हेच सर्वांहून अधिक जहाल क्रांतिवादी होत, असें म्हणण्यापर्यंत स्टालिनने मजल मारली आहे.

मार्क्सने भाकित केलें होतें त्याप्रमाणे कामगारवर्ग अपेक्षित क्रांति करूं शकला नाही; किंवा इतिहासाच्या गूढ शक्तींनीहि मोठी उलथापालथ घडवून आणली नाही. तथापि क्रांति म्हणजे समाजाची मूलगामी पुनर्रचना होणें ही आधुनिक काळाची निकडीची गरज आहे. आणि ही आवश्यकता कामगारवर्गापेक्षा संख्येने जास्त असलेल्या समाजांतील इतर लोकांना अधिक तीव्र जाणीवेच्या रूपाने भासत आहे. मानवी सांस्कृतिक मूल्यांना निर्माण झालेल्या धोक्यामुळे नव्या रचनेची गरज उत्पन्न झाली

आहे. ज्यांना त्या मूल्यांविषयी प्रेम व आस्था आहे अशांनाच ती अधिक वाटणें स्वाभाविक आहे. परंतु सुधारलेल्या मानव-समाजाला योग्य मार्गदर्शन करील असें नवें, आजच्या परिस्थितींत योग्य असलेलें क्रांतीचें तत्त्वज्ञान अजून जन्मास यावयाचें आहे. प्रस्थापित व्यवस्थेचा वीट आलेले अनेकजण आढळतात. त्यांना नव्या समाजनिर्मितीसाठीं मार्गदर्शन करावयाचें झाल्यास प्रस्थापित व्यवस्थेला असलेला नैतिक पाठिंबा नष्ट करण्याचें कार्य नव्या तत्त्वज्ञानास करावें लागेल. त्याचप्रमाणे आजच्या काळच्या गरजा ध्यानांत घेऊन क्रांतीचे नवे मार्ग अशा तत्त्वज्ञानास दाखवावे लागतील. देशकालपरिस्थित्यनुरूप प्रत्यक्ष करावयाच्या कार्याच्या तपशिलांत फरक पडेल हें खरें ! तथापि स्वातंत्र्याची चळवळ ही पुढे जावयाची असल्यास तिला या वर्गपंथीय मर्यादांतून बाहेर पडले पाहिजे. आणि व्यापक मानवतावादी श्रद्धा व जागतिक दृष्टिकोण स्वीकारला पाहिजे. क्रांतीनंतरची समाजव्यवस्था निर्माण करण्यासाठीं पाया निर्माण व्हावा म्हणून लोकांना निरनिराळ्या लोकशाही संस्थांतून संघटित करण्याच्या दृष्टीने पावलें टाकलीं पाहिजेत.

भांडवलदार विरुद्ध कामगार, भांडवल विरुद्ध श्रमशक्ति हा आता मध्यवर्ती प्रश्न नाही. वास्तविकपणें तो तसा कधीच नव्हता. याचा अर्थ तो प्रश्नच नव्हे किंवा तो सोडविण्याचे प्रयत्न करण्याची गरज नाही असा नव्हे; तो अजूनहि सुटावयाचा आहे.

तथापि, आजच्या युगांतील खरा लढा सर्वंकष हुकुमशाही आणि लोकशाही यांजमधील आहे. एकीकडे " राष्ट्र " किंवा " वर्ग " रूपी सर्वभक्षी सामुदायिक अहंकार आहे; आणि दुसरीकडे स्वातंत्र्यासाठीं झगडणारा मानव आहे. भांडवलशाहीचें स्थान फॅसिझमने घेतलें आहे. उलट, साम्यवादाने देखील सर्वंकष हुकुम-शाही स्वरूपाची राजवट निर्माण केली असून जीवनाच्या सर्व क्षेत्रांत लष्करीकरण किंवा हडेलहप्पी आणली आहे. यामुळे आजतरी स्वातंत्र्याचें भवितव्य म्हणजे पुराणांतरींच्या डेव्हिड आणि गॉलियाथ यांच्या द्वंद्वयुद्धासारखेंच दिसत आहे. परंतु आपणच निर्माण केलेल्या या भस्मासुराचा मानव नाश करीलच करील. आणि एकाद्या महान् मत्स्यासुराप्रमाणे सर्व क्षेत्रांत आक्रमण करणारें जगड्व्याळ राज्ययंत्र पुन: कह्यांत आणील असें वाटतें.

---

# नवें राजकीय तत्त्वज्ञान

## : ६ :

राजकारण बुद्धीवर अधिष्ठित करणें शक्य आहे काय ? हा आजचा सर्व प्रश्नांतला खरा प्रश्न आहे. तथापि त्याचें केवळ होकारार्थी उत्तर दिल्याने कार्यभाग पुरा होणार नाही. त्याकरितां " बुद्धि " ही तत्त्वज्ञानांतील अमूर्त कल्पना आणि " बुद्धिवाद " यांतील फरक स्पष्ट करणें आवश्यक आहे. मार्क्सवादी जडवादाच्या विश्वहेतुसिद्धान्ताऐवजी " बुद्धि " या गूढ व अमूर्त कल्पनेचा उल्लेख केल्याने आपण पुढे जाऊं शकूं, असें समजणें चूक आहे. याच प्रश्नाशीं संलग्न असलेला दुसरा प्रश्न म्हणजे राजकारण व नीति यांच्या संबंधाविषयीचा होय. साध्यामुळे साधनें पुनीत होतात, या जेझुइट न्यायाप्रमाणेच क्रांतिवादी राजकीय आचरण चाललें पाहिजे काय ? क्रांतीचें उद्दिष्ट सामाजिक न्याय हें आहे; यामुळे तिचें खरें अधिष्ठान नैतिक आहे. हें एकदा मान्य केलें म्हणजे वरील प्रश्नाचें नकारात्मक उत्तर देणेंच भाग आहे. नैतिक ध्येय हें अनैतिक साधनांनी साध्य होऊं शकते ही गोष्ट अत्यंत संशयास्पद आहे. एखाद्या आणीबाणीच्या वेळीं अत्यंत

मोठाले प्रश्न निर्माण झाले असतांना किंवा फारच मोठा धोका निर्माण झाला असल्यास या बाबतींत थोडीबहुत मुरड घालणें कदाचित् मान्य होऊं शकेल. तथापि एखाद्या क्रांतिकारक राजवटींत नैतिक तत्त्वें आणि परंपरागत मानवी मूल्यें यांच्याशीं पूर्णतया विरोधी स्वरूपाचा व्यवहार स्थिरावला म्हणजे साधनांनी तेथील साध्याचा नाशच केला आहे असें म्हणावयास हरकत नाही. अशा प्रकारच्या साम्यवादी आचरणामुळे स्वातंत्र्य व सामाजिक न्याय यावर आधारलेली नवी समाजरचना जवळ आलेली नाही. कामगारवर्गाला देखील ती समीप आहे असें नाही. उलट, तिच्या योगाने वैचारिक गोंधळ, आध्यात्मिक अराजक, भावनांचें वैफल्य आणि सामान्य अध:पात यांच्या गर्तेकडेच कामगार व अन्य सर्व क्रांतिसेना ढकलली गेली आहे.

या संकटांतून बाहेर येण्यासाठीं नव्या रचनेकरितां झगडणारांनी मानवतावादी आणि मूलगामी नैतिक परंपरांकडेच वळलें पाहिजे. यांच्यापासूनच नव्या तत्त्वज्ञानाची प्रेरणा घेतां येईल. व्यक्तिस्वातंत्र्याच्या मानवतावादी प्रेरणेने उद्युक्त झालेल्या अठराव्या शतकांतील मूलगामी विचारवंतांनी परलोकनिरपेक्ष बुद्धिवाद आणि बुद्धिवादी नीति शक्य आहे असा निष्कर्ष काढला होता. मानव आणि समाज यांचा भौतिकशास्त्रांतील तत्त्वें आणि पद्धती यांच्या साहाय्याने त्यांनी अभ्यास सुरू केला. आज चराचर सृष्टीसंबंधीचें माणसाचें

ज्ञान शंभर वर्षांपूर्वीच्या मानाने कितीतरी वाढलें आहे. यामुळे मूलगामी शास्त्रीय दृष्टिकोण अधिक यशस्वी होण्याचा संभव खूपच वाढला आहे. "बळी तो कान पिळी" या न्यायावर आधारलेल्या जंगली "इतिहासपूर्व" अवस्थेंतून माणूस कधींच बाहेर आला आहे, अशा विश्वासाने कार्यारंभ करणें आज शक्य आहे. सामाजिक संबंध बुद्धिवादाने सुसंवादी बनवितां येतील आणि नैतिक मूल्यें न गमावतां हल्लींच्या पतित आणि भ्रष्टाचार माजविणाऱ्या प्रस्थापित व्यवस्थेऐवजी लोकशाहीवर आधारलेलें नवें जग निर्माण करण्याचे प्रयत्न करतां येणें शक्य होईल असें म्हणण्यास हरकत नाही. मनुष्य हा स्वभावतःच बुद्धिप्रधान व म्हणूनच नीतिमान् आहे. कारण तो सुसंवादी, नियमबद्ध विश्वाच्या कुशींतून अवतरला आहे. म्हणून, समाजाची रचना जर बुद्धीच्या अनुसाराने झाली तर तीमधून नैतिक व्यवस्था निर्माण होईल. संवादी आणि एकमेकांना कल्याणकारी सामाजिक संबंध निर्माण करणाऱ्या बुद्धिप्रधान इच्छेंतूनच नैतिकता निर्माण होते.

मनुष्य एकाएकी शून्यांतून भूतलावर अवतरला नाही. भौतिक विश्वांतूनच जीवसृष्टि उद्भवली आणि तिच्या विकासक्रमांतूनच मनुष्य उत्पन्न झाला. अशा प्रकारें सृष्टीच्या कुशींतून निर्माण झालेल्या मानवाचा आपल्या मातेशीं असलेला मूळचा नाभिसंबंध तुटलेला नाही. आपलें मन, बुद्धि, इच्छाशक्ति या सर्वांसहित मनुष्य हा भौतिक विश्वाचाच एक अंश आहे. विश्व हें नियम-

बद्ध आहे. म्हणून त्याचा अंशरूप जो मानव त्याचें अस्तित्व व परिवर्तन, त्याचे विचार, भावना, इच्छाशक्ति या सर्व नियमबद्ध आहेत. म्हणजेच तो स्वभावतः बुद्धिप्रधान आहे. मानवी बुद्धि हा विश्वाच्या नियमबद्धतेचाच पडसाद होय. मानवाच्या या स्वाभाविक बुद्धिवादित्वांतच त्याच्या नैतिकतेचा उगम शोधला पाहिजे. हें मूळ अधिष्ठान मानलें तरच मनुष्य स्वयंस्फूर्तीने स्वेच्छेने नीतिमान् ठरूं शकेल. नैतिकतेचा पाया बुद्धि हाच होय. नीति हें विवेकबुद्धीला आवाहन आहे. विवेकबुद्धि म्हणजे परिस्थितीची सहजप्रवृत्त जाणीव आणि तिला अनुसरून होणारी प्रतिक्रिया. वास्तविक पाहतां विवेकबुद्धींत गूढ वा गौडबंगाल वाटण्यासारखें असें कांहीहि नाही. तें एक जीवनाचेंच कार्य आहे. केवळ जाणीवेच्या पातळीवर त्याचें स्वरूप यांत्रिक असतें. माणसाची ही स्वाभाविक बुद्धिप्रधानता हाच सुसंवादी समाजव्यवस्थेचा आधार होय. नीति हें बुद्धीचेंच कार्य असल्यामुळे समाजव्यवस्था ही देखील नैतिक व्यवस्थाच होय. म्हणून माणसांत या त्याच्या स्वाभाविक बुद्धिप्रधानतेची जाणीव निर्माण करणें हाच साऱ्या सामाजिक प्रयत्नांचा हेतू असला पाहिजे.

समाजाच्या पुनर्घटनेचा कोणताहि प्रयत्न मुळापासून, सामाजिक घटकापासून म्हणजे व्यक्तीपासून सुरूं होणें आवश्यक आहे. मौलिक दर्शन तें हेंच होय. सर्व मानवी संस्कृतीचा जो वारसा त्याच्या आधारावर नवें तत्त्वज्ञान निर्माण करण्याचा या दर्शनाचा प्रयत्न आहे. आणि या तत्त्वज्ञानाच्या साहाय्याने राजकीय आचार व

आर्थिक पुनर्रचना या संबंधीचे तात्त्विक व व्यावहारिक सिद्धान्त मांडले जातात.

मूलगामीवाद ( Radicalism ) हा 'राष्ट्र' किंवा 'वर्ग' यांच्या दृष्टीने विचार करीत नाही. त्याची दृष्टि मानवाची आहे. स्वातंत्र्य म्हणजे व्यक्तीचें स्वातंत्र्य असा त्याचा अर्थ आहे. म्हणूनच त्याला "नवमानवतावाद" असेंहि म्हणतां येईल. 'नवा' म्हणण्याचें कारण असें कीं शतकानुशतकें संपादिलेलें शास्त्रीय ज्ञान आणि सामाजिक अनुभव यांच्या योगाने अधिक व्यापक, निश्चित व संपन्न बनलेला हा मानवतावाद आहे.

मानवतावाद ही जागतिक विचारसरणी आहे. आंतरराष्ट्रीय-वादासारख्या सुखस्वप्नामागे मानवतावाद धावत नाही; कारण, आंतरराष्ट्रीयवादाच्या पोटांत राष्ट्रवादी राज्यें आलींच. "एक जग" किंवा "एक जागतिक राज्य" ही कल्पना राष्ट्रवादी राज्यांच्या अस्तित्वाशींच विसंगत आहे. म्हणून राष्ट्रवाद जर मान्य केला तर आंतरराष्ट्रीयवाद हा केवळ 'सदिच्छा' किंवा इच्छानुगामी विचार याच रूपाने उरतो. या उलट, स्वतंत्र वृत्तीच्या स्त्रीपुरुषांचें जागतिक संघराज्य ही कल्पना शक्य कोटींतील आहे. जागतिक दृष्टिकोणाच्या मानवतावादी विचारसरणीमुळे भांडवल-शाही, फॅसिस्ट, कम्युनिस्ट किंवा अन्य कोणत्याहि स्वरूपाच्या राष्ट्रवादी राज्यांच्या राजकीय मर्यादा नाहीशा होतील; आणि खरीखुरी आध्यात्मिक मानवजात निर्माण होईल. मानवजातीच्या भवितव्यासंबंधीचा हाच मूलगामी दृष्टिकोण होय.

---

## मूलगामी लोकशाही

## : ७ :

आधुनिक मानवजातीला नवी आशा आणि श्रद्धा देऊं पाहणाऱ्या तत्त्वज्ञानाने स्वातंत्र्याच्या कल्पनेला मूर्त स्वरूप देणें आवश्यक आहे. सामाजिक संघटना आणि राजकीय संस्था ह्या माणसाला स्वातंत्र्यलाभ करून देऊं शकतील का हें पूर्वग्रहदूषित ध्येयवादविरोधी सिद्धान्त आणि कलहप्रवृत्त संप्रदायांचा आग्रह या गोष्टींवरून ठरवावयाचें झाल्यास आजवरच्या सर्व अरिष्टांहून भयानक असलेल्या वर्तमान अरिष्टांतून बाहेर पडणें आणि मानवी प्रगति घडवून आणणें हे केवळ मनांतले मांडेच ठरतील. सर्वमान्य प्रयत्न व्हावेत याकरितां स्वातंत्र्याचें सर्वमान्य गमक प्रथम निश्चित होणें जरूर आहे.

मनुष्याच्या स्वातंत्र्यप्रेरणेचें मूळ त्याच्या आरंभापासून जीवनाकरितां चाललेल्या धडपडीपर्यंत नेऊन भिडवितां येतें. आपल्या जीवनाच्या गरजा पुऱ्या करण्यासाठीं माणसाने केलेल्या प्रयत्नांचा आणि त्यांतून मिळविलेल्या निसर्गावरील प्रभुत्वाचा अर्थ या स्वातंत्र्यलालसेच्या योगाने लागूं शकतो. नैसर्गिक घटना आणि

भौतिक व सामाजिक परिस्थिति यांच्या वर्चस्वापासून मनुष्य अधिकाअधिक मुक्त होत गेला आहे. ही मुक्ति त्याने ज्ञानाच्या साहाय्याने मिळविली आहे. आणि या वाढत्या ज्ञानसंपदेच्या मुळाशीं असलेल्या जिज्ञासेचा आधारदेखील त्याची स्वातंत्र्य-लालसा हाच आहे. जगावें म्हणून शरीरपिंडाच्या चाललेल्या झटापटीचाच बुद्धि व भावना यांच्या उच्चतर पातळीवरील आविष्कार म्हणजेच स्वातंत्र्याची अन्वेषणा होय. आधुनिक समाजांत मनुष्याला स्वतंत्र होण्यासाठीं केवळ आर्थिक गरजा पुऱ्या होऊन आणि स्वास्थ्याची शाश्वती मिळून भागणार नाही. सांस्कृतिक हुडेलहप्पी व शिस्तबंदीपणापासून मुक्त असलेलें असें त्याच्या बौद्धिक व मानवी गुणांच्या विकासाला अनुकूल सामाजिक, मानसिक वातावरणहि त्याला मिळणें आवश्यक आहे. अशा प्रकारचें व्यापक स्वातंत्र्य समाजांतील व्यक्तींना वाढत्या प्रमाणांत मिळत जाणें हाच समाजसंघटना चांगली आहे कीं नाही हें ठरविण्याचा निकष होय. नव्या तत्त्वज्ञानानें " मानव हाच प्रत्येक गोष्टीचा मानदंड होय " हें प्राचीन सूत्र आपलें ब्रीदवाक्य केलें पाहिजे. आणि या ब्रीदवाक्यानुसार असें उद्घोषित केलें पाहिजे कीं कोणत्याहि सामाजिक संघटनेची किंवा राजकीय संस्थेची इष्टानिष्टता ही शेवटीं तिच्यामुळे व्यक्तींना प्रत्यक्ष स्वातंत्र्याचा कितपत उपभोग घेतां येतो, यावरच अवलंबून आहे.

' राष्ट्र ' असो कीं ' वर्ग ' असो प्रत्येक समुदाय हा व्यक्तींचाच बनलेला असतो. आपल्या स्वातंत्र्याच्या साधनेंतूनच

# मूलगामी लोकशाही

मनुष्याने समाज निर्माण केला आहे. रानटी अवस्थेंतील माणसाचा व्यक्तिगत जीवनसंग्राम सुकर व्हावा यासाठींच सह-कार्यावर आधारलेले सामाजिक संबंध मुळांत अस्तित्वांत आले. जीवनसंग्रामांत टिकून राहण्याची जी मूळ आदिमानवाची प्रेरणा तीच सतत चालू राहून स्वातंत्र्यप्रेरणेंत परिणत झाली आहे. सर्व सामाजिक प्रगतीची मूळ प्रेरणा हीच होय. व्यक्तींच्या ठिकाणीं वसत असलेल्या बौद्धिक, नैतिक आणि सर्जनशील सुप्त शक्तींच्या आविष्कारावरील भौतिक, सामाजिक, मानसिक बंधनें नाहीशी होत जाणें म्हणजेच स्वातंत्र्य होय. एखाद्या समाजव्यवस्थेंत स्वातंत्र्याला किंवा प्रगतीला महत्त्व किंवा अवसर आहे कीं नाही हें ठरवावयाचें झाल्यास त्या समाजांतील प्रत्येक व्यक्तीला स्वातंत्र्याचा उपभोग घेतां येत आहे कीं नाही हें सामग्ऱ्याने पाहूनच ठरवितां येईल. त्यावांचून सामाजिक मुक्ति व प्रगति हीं ध्येयें फसव्या स्वरूपाचींच होत.

राजकीय तत्त्वज्ञानाची किंवा सामाजिक पुनर्रचनेची एखादी उपपत्ति जर व्यक्तिस्वातंत्र्य ही एक अर्थशून्य कल्पना म्हणून त्याची उपेक्षा करीत असेल तर तिच्यांतील क्रांतिकारकताहि संशयास्पद म्हणून समजण्यास हरकत नाही. एखाद्या राजकीय प्रयोगांत सामुदायिक अहंकाराच्या कल्पनेपुढे रक्तामांसाच्या मनुष्यास गौणत्व आलें तर तो प्रयोग स्वातंत्र्याच्या दृष्टीने अगदी कुचकामाचाच म्हटला पाहिजे. स्वातंत्र्य नाकारल्याने स्वातंत्र्यप्राप्ति

होते हें म्हणणें अगदी चुकीचेच म्हटलें पाहिजे. स्वातंत्र्य म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य; त्यावांचून स्वातंत्र्यास खरा अर्थच असूं शकत नाही. आणि सर्व वैयक्तिक आणि सामाजिक प्रयत्नांचा हेतु व्यक्तींना हें स्वातंत्र्य अधिकाधिक प्रमाणांत उपभोगावयास मिळणें हाच असला पाहिजे.

समाजाची आर्थिक पुनर्घटना केल्याने स्वातंत्र्याचें नवें जग आपोआप निर्माण होऊं शकेल ही कल्पना चुकीची आहे. त्याच-प्रमाणे दलित आणि शोषित वर्गांच्या प्रतिनिधित्वाचा दावा करणाऱ्या एखाद्या राजकीय पक्षाने सत्ता हस्तगत केल्याने स्वातंत्र्य येतें, हेंहि खरें नाही. खाजगी संपत्ति नाहीशी केली, उत्पादनसाधनें राज्याच्या मालकीचीं केलीं आणि आर्थिक नियोजन केलें म्हणजे आर्थिक शोषण नाहीसें होतें किंवा संपत्तीची समान विभागणी होऊं शकते असेंहि नाही. तंत्रविद्या, कार्यक्षमता आणि सामुदायिक प्रयत्न यांचा पुरेपूर फायदा घेतां यावा याकरितां नियोजित अर्थव्यवस्था व्यक्तिस्वातंत्र्याकडे दुर्लक्ष करते. आणि त्यामुळे आर्थिक प्रयत्नांच्या मूळ हेतूसच हरताळ फासला जातो. आर्थिक समता आणि सामाजिक न्याय यांवर आधारलेली उच्च लोकशाही निर्माण होण्याऐवजी नियोजित अर्थव्यवस्थेमुळे राजकीय हुकुमशाहीचाच संभव बळावतो. ज्याप्रमाणे आर्थिक लोकशाही-वांचून राजकीय लोकशाही संभवूं शकत नाही त्याचप्रमाणे आर्थिक लोकशाहीहि राजकीय लोकशाहीवांचून निर्माण होणें

अशक्य आहे. आर्थिक नियोजनाचा बडेजाव माजविणारांनी हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे.

नियोजन तरी कशाकरितां ? हा खरा प्रश्न आहे. नियोजित अर्थव्यवस्थेमुळे अधिकांचें अधिक हित हमखास साधलें जाईल, म्हणजेच आर्थिक समता व सामाजिक न्याय प्रस्थापित होऊं शकतील असें गृहीत धरण्यांत येतें. असें जर असेल तर नियोजन व स्वातंत्र्य यांचा खरोखरी मेळ घालतां आला पाहिजे. जर आधुनिक तंत्रामुळे अशा प्रकारचा मेळ घालणें कठिण होत असेल तर मानवी कल्याणास पोषक होईल अशा प्रकारचें यंत्रविद्येचें नियमन केलें पाहिजे. यंत्र हा आधुनिक संस्कृतीचा भस्मासूर ठरतां कामा नये. यंत्र हें माणसानेच निर्माण केलें आहे. म्हणून माणसाच्या उद्दिष्टांशीं तें उपकारक झालें पाहिजे. म्हणजेच त्याच्या-योगाने मानवाच्या स्वातंत्र्याचा विकास झाला पाहिजे.

हुकुमशाहीचें समर्थन कोणी कसेंहि करो; परंतु ज्या एका विशिष्ट दृष्टीने मूलगामी मानवतावाद समाजाचा विकास करूं पाहतो त्या दृष्टीने हुकुमशाही निषिद्ध किंवा वर्ज्य आहे. राज-कारण नीतीपासून अलग केल्यास स्वातंत्र्याला धोका निर्माण होणें अपरिहार्य आहे. अनैतिक साधनांनी साध्य निश्चितपणें भ्रष्ट होतें हें आता अनुभवसिद्ध सत्य आहे. सोव्हिएट युनियनमध्ये राज-कीय हुकुमशाही कायमची राहूं पहात आहे; आणि ती म्हणजेच साम्यवाद असा अर्थ करण्यांत येऊं लागला आहे. अशा प्रकारें

साधन हेंच साध्य बनलें आहे. राज्यसंस्था 'सुकून' जाण्याची आशा दिसून येत नाही. सोव्हिएटयुनियनमध्ये समाजवाद प्रस्थापित झाला आहे असें जर म्हणणें असेल तर संक्रमणावस्था संपली आहे असें म्हटलें पाहिजे; आणि मग हुकुमशाही नाहीशी झाली पाहिजे. पण जोपर्यंत दुसऱ्या कोणत्याहि राजकीय पक्षास तेथे वाव नाही; कामगारांचा पक्ष आणि राजकीय हुकुमशाही या नाहीशा होत नाहीत, तोंपर्यंत तेथे उच्चतर स्वरूपाची लोकशाही स्थापन झाली आहे, असें म्हणणें अर्थशून्यच होय.

पाश्चात्त्य लोकशाहींतील आर्थिक व्यवहार हाहि तितकाच निराशाजनक आहे. यामुळे परंपरागत लोकशाही समाजवाद हा देखील यशस्वी होण्याची आशा वाटत नाही. लोकशाहीचाच नवीन स्वरूपांत पुनर्जन्म होणें आवश्यक आहे. याकरितां लोकशाहीने पुन: मानवतावादाच्या परंपरेकडे वळलें पाहिजे. जेथे माणसांना आपलीं डोकीं मानाने वर उचलून व्यवहार करायची संधीच नाही, तेथील तीं डोकीं मोजण्यापुरतीच लोकशाही असून आतां भागणार नाही. केवळ औपचारिक पार्लमेंटरी पद्धतीचें स्थान खऱ्याखुऱ्या लोकशाही व्यवहाराने घेणें आवश्यक आहे. मतें मिळवण्याच्या कुवतीवरून राजकीय पक्षाचें स्वरूप ठरण्या-ऐवजी त्याच्या उद्घोषित तत्त्वांवरून आणि प्रसिद्ध झालेल्या कार्यक्रमावरून तें ठरविलें गेलें पाहिजे. अभिवचनें आणि घोषणा यांच्या आधारावर लोकांनी मतदान करण्याऐवजीं सरकारच्या प्रत्यक्ष

कार्याच्या आधारावरच तें केलें पाहिजें. केवळ डोकीं मोजण्या-पुरतेंच लोकशाहीचें राजकारण राहिल्यास तें शेवटीं सामुदायिक अहंकारापुढे डोकें लववून शरणागतीच पतकरील. त्यांत व्यक्ति किंवा बुद्धिवाद यांना स्थान संभवत नाही. औपचारिक पार्लमेंटरी पद्धतींत कसलाहि विधिनिषेध न बाळगणारे चळवळयेच वर येऊं शकतात. बुद्धिमत्ता, प्रामाणिकपणा, शहाणपणा, नीतिमत्ता हीं मानवीं मूल्यें कोणाच्या खिजगणतींतहि नसतात. परंतु या पावन मूल्यांचा शुद्ध प्रभाव राजकीय संस्था आणि समाजशास-नाचा व्यवहार यांवर पडल्यावांचून खऱ्या लोकशाही जीवन-पद्धतीचा विकास होणें अशक्य आहे.

मानवतावादी परंपरेंतील हीं मूल्यें ज्यांनी आत्मसात केलीं आहेत असे स्त्री-पुरुष आजच्या जगांतहि कांही कमी नाहीत. परंतु पुढारीबाजी त्यांना तिरस्करणीय वाटत असल्यामुळे त्यांच्या-कडे सार्वजनिक जीवनांतील नेतृत्व येणें शक्य नाही. उलटपक्षीं, अशा प्रकारचे मानवतावादी मूल्यें आत्मसात केलेले नागरिक निर्माण होऊं नयेत अशा तऱ्हेचें मारक वातावरणच हुकुमशाही कारभारांत असतें. मग त्या हुकुमशाहीचा हेतू किती कां स्तुत्य असेना. यामुळे औपचारिक लोकशाही आणि हुकुमशाही यांच्या कचाट्यांत सांपडलेल्या आजच्या मानवजातीचें नुकसान होत आहे. तिला आपला व्यवहार मानसिक स्वातंत्र्य लाभलेल्या "मुक्तात्म्यांकरवीं" चालवितां येत नाही. आणि स्वातंत्र्याच्या दिशेने प्रगतीहि करतां येत नाही.

मानवी मूल्यांचा जेथे लोकशाहींतील राजकीय व्यवहारावरहि प्रभाव पडतांना दिसत नाही तेथे हीं मूल्यें सांस्कृतिक हडेल-हप्पी व शिस्तबंदीमुळे नष्ट होतात म्हणून हुकुमशाहीविरुद्ध तक्रार करण्यांत अर्थ नाही. आजच्या अविचारी जगाला हुकुमशाहीच्या आकर्षणापासून मुक्त करणें आवश्यक आहे. केवळ जवळचाच नव्हे तर स्वातंत्र्याकडे जाण्याचा तेवढाच मार्ग आहे, अशी त्याची समजूत आहे. ही समजूत लोकशाहीने पुन्हां मानवतावादी सांस्कृतिक परंपरेचें रहस्य आत्मसात् केल्यावांचून घालवितां येणार नाही. सर्व क्षेत्रांत मानव हाच मानदंड समजला गेला पाहिजे. बुद्धिमत्ता, प्रामाणिकपणा, शहाणपणा, नैतिकता हेच नेतृत्वाचे निकष ठरले पाहिजेत. लोकशाही यापुढे केवळ . गृहीत धरून भागणार नाही. आज सर्व स्वातंत्र्यप्रिय विचारवंतांपुढे एकच महत्वाचा प्रश्न आहे; आणि तो म्हणजे " लोकशाही शक्य आहे काय ? " लोकशाही समाजवादाच्या पुरस्कर्त्यांना हुकुमशाही अमान्य आहे हें बरोबर आहे. परंतु त्यांनाहि या या प्रश्नांचें समाधानकारक उत्तर अजून देतां आलेलें नाही. वस्तुत: इतर कशाहीपेक्षा आपल्या सदसद्विवेकबुद्धीचा निर्णय मानणारीं बौद्धिक व नैतिक स्वातंत्र्यप्रिय माणसें समाजाचें कार्य चालविण्यास मिळालीं पाहिजेत. असें झालें तरच अधिकांचें अधिक हित हें लोकशाहीचें उद्दिष्ट आपणांस गांठता येईल.

नैतिक अधिष्ठान हेंच सर्वांहून मोठें अधिष्ठान होय. पार्लमेंटरी लोकशाहीची देखील खरी हमी कायदा नव्हे. सत्तारूढ बहुसंख्यांकां-

च्या सदसद्विवेकबुद्धीवरच ती अवलंबून आहे. ती देखील उच्च साध्याचें साधन असल्याचाच दावा करते. परंतु सत्तेचा मोह इतका जबरदस्त आहे कीं त्याच्यापुढे सामूहिक नीतिमत्तेचा आधारहि लटपटतो. मूल्यें प्रत्यक्षांत आचरणांत आणायचीं तर तीं व्यक्तीच्याच द्वारें आणलीं जातात. म्हणून आपल्या सदसद्-विवेकबुद्धीप्रमाणे चालणाऱ्या स्वातंत्र्यप्रिय व्यक्तींचें राज्य हीच अधिकांचें अधिक हित साधण्याची हमी होय. लोकशाहीला आजच्या भयानक अरिष्टांतून सुरक्षित बाहेर पडायचें असेल आणि हुकुमशाहीला जर टक्कर द्यावयाची असेल तर लोकशाहीने आपल्या तत्त्वज्ञानाला नवीन दिशा दिली पाहिजे. तात्त्विक दृष्टया नवें अधिष्ठान शोधणें आवश्यक आहे.

या विवेचनाचा अर्थ, कांही बुद्धिमान् अशा निवडक श्रेष्ठींचें राज्य असावें, असा नव्हे. व्यक्तीच्या सर्जनशीलतेच्या विकासाला पुरेपूर वाव मिळेल अशा प्रकारची समाजव्यवस्था येथे अभिप्रेत आहे. राज्यसत्तेच्या कार्यकारी क्षेत्रावर स्वातंत्र्यप्रिय नागरिकांचा सतत ताबा राहणें हें या समाजव्यवस्थेचें एक महत्त्वाचें अंग होय. प्रस्थापित हितसंबंध आणि पुढारी म्हणविणारांच्या मोहक घोषणांनी भारावून जाणाऱ्या सामुदायिक अहंकाराच्या कल्पना यांच्या वर्चस्वापासून मुक्त असणें हें स्वातंत्र्यप्रियतेचें लक्षण होय. वळोवेळीं होणाऱ्या निवडणुकींपुरताच लोकशाहीचा व्यवहार मर्यादित राहतां कामा नये. वयांत आलेल्या सर्व स्त्रीपरुषांना

जरी मतदानाचा हक्क दिला आणि कार्यकारी शासनमंडळ हें जरी निवडलेल्या लोकांचें असलें तरी देखील लोकशाही ही केवळ औपचारिक स्वरूपाचीच राहूं शकेल. सत्तादान, मग तें अगदीं मर्यादित काळापुरतें कां असेना, तें लोकशाहीचा कोंडमारा करतें. लोकांकरितां राज्य हें पूर्णपणें लोकांचें व लोकांनी चालविलेलें राज्य बनूं शकत नाही.

लहानलहान संघटित स्थानिक लोकशाह्यांच्या पायावर उभारलेलें पिरामिडच्या स्वरूपाचें राज्ययंत्र निर्माण झालें तरच जनतेला राज्यकारभारांत प्रत्यक्ष भाग घेणें शक्य होईल. या लहानलहान लोकशाह्यांचें आद्य कर्तव्य म्हणजे नागरिकांच्या ठिकाणीं त्यांच्या सार्वभौमत्वाच्या हक्काविषयी जाणीव निर्माण करणें आणि तो हक्क शहाणपणाने आणि सदसद्विवेकबुद्धीप्रमाणे बजावण्यास समर्थ करणें हें होय. अशा रीतीने एक प्रकारच्या राजकीय शाळांच्या आधारावरच लोकशाहीची उभारणी केली जाईल. सार्वमताचा आणि आपल्या प्रतिनिधींचें प्रतिनिधित्व काढून घेण्याचा अधिकार या लहान लोकशाह्यांकडेच राहील. त्यायोगें राज्यावर जनतेचें प्रत्यक्ष व परिणामकारक नियंत्रण राहूं शकेल. निवडणुकीसाठीं कोणते उमेदवार उभे करावयाचे हें ठरविण्याचा अधिकारहि या लोकशाह्यांनाच असावा. यामुळे लोकशाही पक्षोपपक्षांच्या राजकारणाबाहेर पडूं शकेल आणि व्यक्तींना आपल्या गुणांच्या जोरावर मान्यता मिळविणें शक्य होईल. पक्षनिष्ठा,

पक्षाचा वशिला व अन्य वशिलेबाजी इत्यादि दोषांमुळे बौद्धिक स्वातंत्र्य, नैतिक सचोटी आणि शुद्ध बुद्धि या सद्गुणांना हरताळ फासला जाणार नाही.

निराळ्या शब्दांत हाच आशय सांगावयाचा झाला तर तो असा कीं लोकशाहीव्यवहार शक्य व्हावा यासाठीं अनुकूल परिस्थिति निर्माण केली पाहिजे. याकरितां सर्वांगीण जाणीवयुक्त प्रयत्नांची गरज आहे. अशा प्रयत्नांनीच जनतेंत स्वातंत्र्यलालसा जागृत करून व त्यांच्या ठिकाणीं स्वावलंबनाची वृत्ति निर्माण करून आपल्या भवितव्याचे आपणच निर्माते बनूं शकतों, असा त्यांचा आत्मविश्वास वाढीस लावावा लागेल. स्वतंत्र विचाराचें महत्त्व त्यांना पटवावें लागेल. असें झालें तरच स्वातंत्र्याऐवजी गुलामांची सुरक्षितता पतकरण्याची व त्यासाठीं बाह्य सत्तेपुढे मान लवविण्याची वृत्ति त्यांच्या ठिकाणीं निर्माण होऊं शकणार नाही. याकरितां बुद्धिवाद, व्यक्तिस्वातंत्र्य आणि जागतिक दृष्टिकोणाचा मानवतावाद यांवर आधारलेलें नवजीवनाचें नवें आंदोलन होणें आवश्यक आहे. अशा आंदोलनाच्या योगानेच लोकशाहीचा विकास होऊन लोकशाही आत्मरक्षणास समर्थ बनेल.

मानवी मूल्यांचा विजय व्हावा याप्रीत्यर्थ वाहून घेणाऱ्या बुद्धिमंतांचें बौद्धिक स्वातंत्र्य उपरिनिर्दिष्ट वातावरणांतच वाढीस लागेल. "वर्ग" किंवा "राष्ट्र" यांसारख्या सामुदायिक अहंकाराच्या वेदीवर व्यक्तीस बळी न देतां सबंध समाजालाच

वळण देण्याचें कार्य नैतिक प्रकर्षानेच साधूं शकेल. नीतिसंपन्न स्त्रीपुरुष हेच विचारी जनतेच्या विश्वासास पात्र बनून नेते म्हणून मान्य केले जातील. राजकीय पुढारीबाजीचा भाव घसरेल. लोकशाहीचें राजकारण म्हणजे वेळोंवेळीं होणाऱ्या निवडणुका असा अर्थ राहणार नाही. लोक म्हणजे केवळ झुंडी ( Masses ) असेंहि समजलें जाणार नाही.

अशा प्रकारच्या नव्या लोकशाहीचा परिस्थितीवर मात करण्याइतपत विकास होण्यास कालावधीची गरज आहे. तथापि संक्रमणकालांत राज्यसंस्थेस सल्ला व मार्गदर्शन मिळण्यासाठीं सर्जनशील प्रतिभेचे, नि:स्वार्थी बुद्धीचे आणि नैतिक प्रकर्षाने संपन्न असे नागरीक राज्यसंस्थेंत उच्च अधिकारस्थानावर येतील अशी तरतूद राज्यघटनेने होणें आवश्यक आहे. मधल्या संक्रमणकाळांत लोकशाही, निवडणुका आणि निवड या दोन्हींवर आधारली पाहिजे. लोकांची बौद्धिक व नैतिक पातळी बरीच सुधारल्यावांचून केवळ निवडणुकांच्या योगाने चांगलीं माणसें पुढे येणें अशक्य आहे. नि:स्वार्थ बुद्धीच्या नीतिमान् नागरिकांना चालू परिस्थितीवर परिणाम घडून आणण्यास योग्य तो वाव दिल्याशिवाय लोकशाही समर्थ होणें अशक्य आहे.

संक्रमणकाळांत उर्वरित सत्ता राज्यपरिषदेकडे सोंपविण्यांत यावी. या परिषदेंत बुद्धिमान् वैज्ञानिक दृष्टिकोण असलेलीं, अनुभवी, शहाणी व नीतिमान् माणसें असावींत. अशीं माणसें

सामान्यत: राजकारणापासून अलिप्त राहतात. यामुळे “ धंदेवाईक ” राजकारणी लोकांमध्ये तीं आढळणें कठिण असतें. त्यांनाच समाजाचें नेतृत्व करण्याचा खरा अधिकार आहे. त्यांचें सहकार्य मिळविण्यासाठीं पुढील उपायांचा अवलंब करतां येईल.

इंजिनियर, अर्थशास्त्रज्ञ, वैज्ञानिक, डॉक्टर, कायदेशास्त्रपंडित, इतिहासकार आणि अशाच प्रकारच्या अन्य बौद्धिक, साहित्य-विषयक, कलात्मक वा तत्सम सर्जनशील कार्य करीत असलेल्या लोकांच्या निरनिराळया गटांनी राज्यपरिषदेच्या सभासदत्वासाठीं आपणांपैकीं कांही नांवें सुचवावीत. त्यांची या परिषदेवर राष्ट्रपतींनी नेमणूक करावी. त्याबरोबरच कोणत्याहि विशिष्ट गटांत न मोडणाऱ्या कांही व्यक्तींची नेमणूक करण्याचा अधिकारहि राष्ट्रपतीस असावा. या विविध धंद्यांच्या गटांतील एखाद्या व्यक्तीचे नोकरीव्यतिरिक्त अन्य प्रकारचे एखाद्या नफ्यासाठीं चालणाऱ्या संघटनेशीं द्रव्यप्राप्ति करून देणारे संबंध असतील तर राज्यपरिषदेवर त्याची नेमणूक होऊं नये. असें केल्याने प्रस्थापित हितसंबंधांचें अप्रत्यक्ष नियंत्रण टाळतां येईल. आर्थिक, आरोग्यविषयक, शैक्षणिक, सांस्कृतिक आणि अन्य सर्व क्षेत्रांतील विकासाचा कार्यक्रम ठरविण्याचा आणि त्याच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीबाबत मार्गदर्शन व देखरेख करण्याचा अधिकार राज्यपरिषदेकडे देण्यांत यावा.

आरंभीं प्रस्थापित हितसंबंधांच्या गळचेपी करणाऱ्या व भ्रष्टाकार माजवणाऱ्या वर्चस्वापासून आर्थिक जीवन मुक्त करणें आवश्यक आहे. असें झालें तरच जास्तींत जास्त लोकांना विचार-स्वातंत्र्याचा लाभ होऊं शकेल. दुसरें म्हणजे अशा प्रकारें स्वतंत्र विचाराच्या व्यक्तींनाच सामाजिक कल्याणाचे खरे विश्वसनीय राखणदार मानले पाहिजे. आणि त्या दृष्टीने त्यांना कार्य करतां येईल अशा प्रकारची संधि त्यांना दिली पाहिजे. त्यांच्या नेतृत्वामुळेच समाजाची खऱ्या लोकशाही स्वातंत्र्याच्या दिशेने प्रगति होऊं शकेल. जर आज लोकशाही विकसित झाली नसतांना केवळ डोकीं मोजूनच कारभार करावयाचें म्हटलें तर लोकशाहीस वरील व्यक्तींच्या उत्तम नेतृत्वास मुकावें लागेल.

जिच्यांत माणूस माणसाचें शोषण करूं शकणार नाही अशा प्रकारची आर्थिक पुनर्रचना ही मौलिक मानवतावादी दर्शनांत अभिप्रेत आहे. मनुष्याचा बौद्धिक व सांस्कृतिक विकास होण्या-साठीं त्याच्या भौतिक गरजा अधिकाधिक प्रमाणांत पुऱ्या होणें आवश्यक आहे. सर्वांचें राहणीचें मान सतत सुधारत जाईल अशा प्रकारें अर्थव्यवस्थेची पुनर्रचना करणें हा मूलगामी लोक-शाही राज्याचा पायाच होय.

नव्या मूलगामी समाजरचनेंतील अर्थव्यवस्था ही माणसांच्या गरजांना अनुलक्षून उपभोगासाठीं उत्पादन व विभागणी या तत्त्वांवर आधारलेली राहील. या नव्या समाजरचनेंतील राजकीय

संघटनेंत लोकांच्या हातची खरीखुरी सत्ता काढून घेणाऱ्या प्रतिनिधींना सत्तादान करण्याचें तत्त्व राहणार नाहीं. ही संघटना लोकसमित्यांच्या रूपांत उभारली जाईल; आणि या समित्यांच्या द्वारा सर्व वयांत आलेले स्त्रीपुरुष राजकीय जीवनांत प्रत्यक्ष भाग घेऊं शकतील. सार्वत्रिक ज्ञानप्रसार आणि शास्त्रीय व अन्य क्षेत्रांतील सर्जनशीलतेस उत्तेजन यांवर या नवीन समाजरचनेंतील सांस्कृतिक जीवनाची उभारणी केली जाईल. विवेकबुद्धि आणि ज्ञान यांवर आधारलेली ही नवीन समाजरचना नियोजितच राहील. परंतु या नियोजनाच्या मागे व्यक्तिस्वातंत्र्याचा विकास हाच मुख्य हेतु राहील. याप्रमाणे ही नवी समाजरचना राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक इत्यादि सर्व दृष्टींनी खऱ्या लोकशाही स्वरूपाचीच असेल आणि ती लोकशाही आत्मरक्षणास समर्थ होईल.

बुद्धीवरील बंधनें तोडून टाकून मानसिक दृष्टया स्वतंत्र झालेलीं माणसें स्वातंत्र्याचें नवें जग निर्माण करण्याच्या दृढ निश्चयाने आपल्या सामुदायिक प्रयत्नांनी मूलगामी लोकसत्तेचें ध्येय साध्य करतील. भावी राज्यकर्ते म्हणून नव्हे तर जनतेचे मार्गदर्शक, मित्र व तत्त्वज्ञ या नात्यानेच त्यांचें कार्य चालेल. स्वातंत्र्याच्या ध्येयाशीं सुसंगत म्हणून त्यांचें राजकीय वर्तन व कार्य बुद्धिप्रधान व नैतिक स्वरूपाचेंच राहील. जनतेची स्वातंत्र्याकांक्षा जसजशी वाढीस लागेल तसतशी त्यांच्या प्रयत्नांची वाढ होईल. आणि अखेरीस सुजाण लोकमत व लोकांचे ज्ञानयुक्त

प्रयत्न यांच्या योगाने मूलगामी लोकसत्तेने संपन्न असें राज्य प्रस्थापित होईल. सत्तेचें केंद्रीकरण आणि स्वातंत्र्य यांच्यांत परस्पर विसंगति आहे, याची जाणीव असल्यामुळे नवमानवतावादी सत्तासंपादनाची इच्छा धरणार नाहीत. छोट्या छोट्या लोक-समित्यांतून लोकशाही संघटित व्हावी यासाठीं ते साहाय्य करतील; आणि शेवटीं या लोकसमित्याच लोकसत्तेचा वापर करणारीं साधनें बनतील. अशा रीतीने शेवटीं राज्यसंस्थाच समाजाशीं एकरूप होऊन जाईल; आणि राज्यसंस्था हें दंडशासनाचें साधन म्हणून शिल्लक राहणार नाही. अशा प्रकारें लोकांचें लोकांनीच चालविलेलें राज्य या अर्थाने लोकशाही निर्माण होणें शक्य होईल.

मौलिक पृथक्करण करून पाहिलें तर असें दिसून येईल कीं व्यक्तिस्वातंत्र्यावर आक्रमण न करतां सर्वांची प्रगति व भरभराट करणारी सामाजिक रचना ही नागरिकाला शिक्षण देण्यावरच अव-लंबून असते. लोकसमित्या या एकप्रकारें नागरिकत्वाच्या आणि राजकारणाच्या शिक्षणाचीं विद्यालयेंच बनतील. निःस्वार्थी व्यक्तींना समाजकार्याची धुरा वाहण्यास समर्थ करील अशीच मूलगामी लोकसत्ताक राज्याची रचना व कार्यपद्धति राहील. अशा निःस्वार्थी व्यक्तींकरवी चालविलें जाणारें राज्ययंत्र हें ज्याची नेहमी भीति वाटावी, शंका यावी, असें जुलमी स्वरूपाचें सर्वंकष राज्य होऊं शकणार नाही.

# मूलगामी लोकशाही

मानव हाच स्वत:च्या विश्वाचा शिल्पकार आहे, या मूलभूत ऐतिहासिक सत्यावर भर देणें हेंच क्रांतिकारक व विमोचक सामाजिक तत्त्वज्ञानाचें मुख्य कार्य होय. मानव हा विचारशील प्राणी आहे. आणि ही विचारशीलता, तो व्यक्तित्वसंपन्न राहिला तरच दिसून येईल. मेंदू हें उत्पादनाचें साधन असून तें अत्यंत क्रांतिकारक वस्तू निर्माण करतें. क्रांत्या व्हावयाच्या तर त्यापूर्वी रूढ कल्पनांचा विध्वंस करणाऱ्या विचारांची निर्मिति व्हावी लागते. ज्यांना आपल्या सर्जनशील आत्मशक्तीचा प्रत्यय आला आहे, विश्वाची नवरचना करण्याच्या दुर्दम्य इच्छाशक्तीनें जे प्रेरित झाले आहेत, धाडसी विचारांनी जे संचारित झाले आहेत आणि स्वतंत्र मानवांचा बनलेला स्वतंत्र समाज निर्माण करण्याच्या ध्येयाची ज्योत ज्यांच्या अंत:करणांत प्रज्वलित झाली आहे अशांची संख्या सतत वाढत गेल्यानेच लोकशाही नांदण्यास अनुकूल परिस्थिति निर्माण होऊं शकेल. अशा मानसिक दृष्ट्या स्वतंत्र झालेल्या माणसांनीच पुढाकार घेतल्याने गुलामगिरीच्या सगळ्या शृंखला निखळून पडतील आणि सर्वांच्या स्वातंत्र्याचें नवें युग उदयाला येईल.



## सत्ता-आणि-पक्षविरहित राजकारण

: ८ :

" सत्तेचें राजकारण " असा वाक्प्रयोग अनेक वेळां केला जातो; राजकारणाचा सत्तेशीं संबंध असलाच पाहिजे असें नव्हे, हें त्यावरून सूचित होतें. तथापि, त्याबरोबरच सत्तेवांचून राजकारण प्रत्यक्षांत कसें शक्य आहे या विषयीची स्पष्ट कल्पना मात्र फारच थोड्या लोकांना करतां येते.

आधुनिक काळांतील राजकीय जीवनांत पक्षसंघटनेलाहि स्थान प्राप्त झालें आहे.

पक्षपद्धतीच्या योगाने आधुनिक राजकीय जीवनाचा मूळ हेतूच निष्फळ झाला आहे. लोकांसाठीं, लोकांनी चालविलेलें, लोकांचें राज्य प्रस्थापित करणें अशा प्रकारें या हेतूची घोषणा केली जाते. परंतु लोकराज्याच्या या व्याख्येंतील शेवटच्या दोन लक्षणांना पक्षपद्धतीमुळे बाध येतो. पक्षपद्धतीमुळे " लोकांचे " आणि " लोकांनी चालविलेलें " राज्य निर्माण होऊं शकत नाही. विशिष्ट पक्षाचें राज्य मग तें कितीहि चांगलें कां असेना, हें केवळ " लोकांसाठीं " चालणारें राज्य होऊं शकतें. आज एका पक्षाचें

राज्य तर उद्यां दुसऱ्याचें; आणि दोहोंचाहि दावा सारखाच ! लोकशाहीपूर्व राज्यें आणि अशा प्रकारचें लोकशाही राज्य यांत महत्त्वाचा कसलाहि फरक सांपडणें कठिण आहे.

केवळ "लोकांसाठीं" चालणारें राज्य म्हणजे लोकशाही असें जर मान्य केलें तर कल्याणकारी हुकुमशाहीला उत्कृष्ट स्वरूपाची लोकशाहीच म्हणावें लागेल. तात्पर्य, आधुनिक काळांतील पक्षोपपक्षांचीं राज्यें हीं लोकशाहीपूर्वराज्यांपेक्षा विशेष भिन्न स्वरूपाचीं आहेत असा दावा करतां येत नाही. पूर्वीच्या काळांत लोक राजांना निवडून देत नसत; आणि आता लोकांनी निवडून दिल्यामुळे राजकीय पक्ष सत्तारूढ होतात, एवढाच काय तो फरक दिसतो, असें म्हणतां येईल.

युरोपांत मध्ययुगाच्या अखेरच्या काळांत सरंजामशाहींतील अनिर्बंध राज्यसत्तेविरुद्ध बंड करण्याची प्रेरणा लोक हेच सार्वभौम होत या विचारांतून मिळाली. आणि या बंडामुळेच लोकशाही राज्यें जन्मास आलीं. प्राचीन ख्रिस्त धर्माने आत्मसात् केलेल्या जुन्या ग्रीसमधील स्टोइक परंपरेंतून मनुष्य हा नीतिशील प्राणी आहे व म्हणून तो स्वभावतःच सार्वभौम आहे, असा निष्कर्ष काढण्यांत आला. आणि व्यक्तीच्या सार्वभौमत्वावरील हा विश्वास आधुनिक लोकशाही विचारसरणीचा पाया बनला. एखाद्या विशिष्ट राज्यांतील लोक म्हणजे या सार्वभौम व्यक्तीच होत; यामुळेच लोकांचें म्हणजे समुदायाचें सार्वभौमत्व हा उपसिद्धान्त निघाला.

आणि या सार्वभौम लोकांपासून अधिकार प्राप्त होणारें लोकशाही राज्य हेंच सार्वजनिक जीवन योग्य व न्याय्य स्वरूपांत चालवूं शकेल असा दावा करण्यांत आला. लोकशाहीची ही मूळ कल्पना प्रगमनशील आणि विमोचक स्वरूपाची होती, यांत संशय नाही. खरें लोकशाही राज्य हें सुराज्यच असणार हा अर्थ तिच्यांत अभिप्रेत होता.

परंतु कालांतराने लोकशाहीच्या प्रत्यक्ष व्यवहाराची या तत्त्वापासून फारकत झाली. राजकारणी लोकांच्या हेतुपुरस्सर बनवाबनवीमुळे हें घडलें नाही. मोठमोठ्या लोकसंख्येच्या आधुनिक राजकीय घटकांमध्ये लोकशाही तत्त्वांचें प्रत्यक्ष आचरण कसें करावयाचें हा प्रश्न समाधानकारकपणें न सुटल्याचा तो परिणाम होय.

लहानसहान समुदायांत लोकांना राज्यसत्तेचें प्रत्यक्ष नियंत्रण करणें शक्य होतें. एखाद्या मध्यवर्ती ठिकाणीं गोळा होऊन, विविध प्रश्नांची चर्चा करून त्यासंबंधीचे निर्णय लोक घेऊं शकतात आणि त्या निर्णयांची अंमलबजावणी करण्यासाठीं अधिकाऱ्यांची निवडहि करूं शकतात.

तथापि, सतराव्या आणि अठराव्या शतकांत मोठमोठ्या भूप्रदेशावर वर्चस्व असलेलीं अशीं प्रचंड लोकसंख्येचीं राज्यें निर्माण झालीं. अशा राज्यांत वरील व्यवहार अशक्य होता. सबंध फ्रान्समधील लोकांनी एकत्र येऊन आपलें सरकार प्रत्यक्ष निवड-ण्याच्या कल्पनेची अव्यवहार्यता स्पष्ट होती. या अडचणींतून

बाहेर पडण्यासाठीं प्रतिनिधिसत्तेचा मार्ग निघाला. लोकांनी सार्वभौम सत्ता प्रतिनिधींच्या हवाली करण्याची कल्पना ह्या मार्गात अंतर्भूत होती. अशा प्रकारें आरंभापासूनच आधुनिक लोकशाही राज्यें हीं केवळ "लोकांसाठीं" चालणारीं राज्यें बनलीं. लोकांच्याच वतीने आपण राज्य करीत आहोंत, आपणांस लोकांपासूनच अधिकार प्राप्त झाले आहेत असे राज्यकर्ते म्हणत खरे; पण ते आणि सामान्य मतदार यांच्यामध्ये अंतर निर्माण झालें; अनेक मध्यस्थ स्वरूपाच्या संघटना निघाल्या, आणि मत-दारांचें वा लोकांचें राज्यकर्त्यांवरील नियंत्रण नष्ट झालें. "लोकां-साठीं" राज्य करणारे प्रत्यक्षांत लोकांवर राज्य चालवूं लागले. सार्वभौम सत्ता असलेले लोक हे शासित बनले. सार्वभौमत्व असलेल्या व्यक्ती आपला अधिकार केवळ वेळोंवेळीं मतदान करण्यापुरताच उपयोगांत आणूं लागल्या. दोन निवडणुकींच्या दरम्यानच्या काळांत राज्यकर्ते वा राजकीय व्यवहार यासंबंधीं त्यांना कांहीहि करणें फारसें शक्य नाही. हाच व्यवहार अजूनहि चालू आहे. ही लोकशाही मुळींच नव्हे.

प्रातिनिधिक राज्यपद्धतीमध्ये निरनिराळे राजकीय पक्ष लोकां-च्या मतांची याचना करतात. निवडणुकींत यशस्वी होणारा पक्ष लोकांच्या सार्वभौमत्वाचें प्रतिनिधित्व आपणाकडे असल्याचा दावा सांगतो. अशा पक्षाचें सरकार बनतें. अशा प्रकारें सार्वभौमत्व लोकांकडून पक्षांतील मूठभर राजकारणी कार्यकर्त्यांकडे जातें.

तथापि, सार्वभौमत्व हा व्यक्तीचा न टाकतां येणारा हक्क आहे; आणि म्हणूनच सार्वभौम सत्तेचें स्थानांतर होऊं शकत नाही. प्रातिनिधिक सरकार हें वास्तविक आपल्या नियंत्रक पक्षाचेंच प्रतिनिधि असतें; आणि अशा कोणत्याहि मोठ्याहून मोठ्या पक्षाच्या सभासदांची संख्या देखील एकंदर लोकसंख्येचा लहानसा भागच असतो. म्हणजे वेगळया शब्दांत सांगावयाचें झाल्यास प्रातिनिधिक स्वरूपाचें पक्षाचें सरकार म्हणजे अल्पमताचें राज्य होय.

यथार्थ लोकशाही ही प्रत्यक्ष लोकशाहीच असली पाहिजे; राज्यकर्त्यांचें लोकांकरवी नियंत्रण झालें पाहिजे. हें शक्य आहे काय ? हा आजच्या राजकारणांतील खरा वैचारिक प्रश्न आहे. तो सोडविल्यानेच राजकीय व्यवहार पक्षोपपक्षांनी लोकशाहीच्या नांवाने चालविलेल्या सत्तेच्या कलहांपासून मुक्त होऊन उच्च पातळीवर जाऊं शकेल. " लोकांचें " आणि " लोकांनी चालविलेलें " राज्य नसेल तर तें लोकशाही या संज्ञेस पात्र नव्हे. पक्षपद्धति उद्भवल्यामुळे लोकांचें सार्वभौमत्व ही एक घटनात्मक कल्पित वस्तू बनली आहे. आणि मोठमोठ्या लोकसंख्येच्या आधुनिक राष्ट्रांमध्ये प्रत्यक्ष लोकशाहीचा व्यवहार अव्यवहार्य वाटल्यामुळे पक्षपद्धति उद्भवली आहे. आणि पक्षपद्धतीमुळे राजकारणाला सत्तेसाठीं चालणाऱ्या कलहाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. यामुळे सत्तेचें राजकारण नको असल्यास पक्षोपपक्षांचें राजकारण नाहीसें करणें ही त्याची प्राथमिक गरज आहे.

# सत्ता-आणि-पक्षविरहित राजकारण

पक्षपद्धतीवांचून लोकशाही संभवत नाही असें कांहींचें म्हणणें आहे. तथापि या म्हणण्यांत राजकीय पक्ष या अगदीं अलिकडच्या काळांत अस्तित्वांत आलेल्या संघटना होत; या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष होतें किंवा केलें जातें. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं आजच्या सारखे राजकीय पक्ष अस्तित्वांत नव्हते. जॅकोबिन्स किंवा जिरॉंडिस्टस् हे राजकीय पक्ष नव्हत. इंग्लंडमध्ये सतराव्या शतकांत देखील पक्ष होते; पण ते राजकीय पक्ष नव्हते. त्या धार्मिक गटाच्या वा दरबारांतील कारस्थानांच्या संघटना होत्या. आज अस्तित्वांत असलेल्या राजकीयपक्षसंघटना या एकोणिसाव्या शतकांत प्रथम अस्तित्वांत आल्या; कारण त्याच काळांत लोकशाहीच्या जुन्या कल्पनेऐवजीं प्रतिनिधिसत्तेची कल्पना उदयास आली. प्रतिनिधींना सत्तादान करण्याच्या तत्त्वावर आधारलेल्या पार्लमेंटरी ( संसदीय ) पद्धतीमुळे लोकशाहीचें स्वरूप फसवें नसलें तरी अगदीं नामधारी बनलें आहे.

या पार्लमेंटरी ( संसदीय ) पद्धतींत व्यक्तीचें सार्वभौमत्व ही एक अर्थशून्य कल्पना बनते; आणि लोकशाहीच्या नांवाने ही सार्वभौम व्यक्ति पक्षाची शरणागति पतकरते; पक्षाच्या यंत्रणेचा एक भाग बनून आपलें स्वतंत्र अस्तित्व गमावते. राजकीय मागासलेपणाच्या आणि अज्ञानाच्या वातावरणांत या पद्धतीचा दुरुपयोग होऊं शकतो हें आता प्रत्यक्ष अनुभवाने सिद्ध झालें आहे. विशिष्ट पक्षांत असल्यामुळे चारित्र्यहीन व्यक्ती देखील

अधिकारस्थानावर येऊं शकतात. बौद्धिक वा नैतिक गुणांवर पक्षसंघटनेंत व्यक्तींना मानाचें स्थान प्राप्त होऊं शकत नाहीं; सत्तासंपादनार्थ जे अधिक उपयुक्त तेच मोठे बनतात. यामुळे सत्तेसाठीं वा फायद्यासाठीं सत्ता मिळवूं पाहणारी वैयक्तिक महत्त्वाकांक्षाच पक्षसंघटनेंत वाढीस लागते.

लोकशाही विचारसरणीचें मूलभूत तत्त्व म्हणजे सार्वभौम सत्ता लोकांचीच आहे हें होय. परंतु पक्षपद्धतीमुळे राजकीय व्यवहारांत बोकाळलेल्या या सत्ताकलहांत लोक कोठेंच असत नाहीत. आजपर्यंत लोकांच्यावतीने राजकीय सत्ता हातीं घेऊन लोकांच्या नियंत्रणाखालीच तिचा अंमल केल्याचें एकाहि राजकीय पक्षाचें उदाहरण आढळत नाही. यामुळे पार्लमेंटरी ( संसदीय ) पद्धतींत पक्षांची हुकुमशाहीच अस्तित्वांत येते. कोणतीहि लोकशाही राज्यघटना, ही शक्यता पूर्णपणें टाळूं शकत नाही. कोणत्याहि बहुमतवाल्या पक्षाला आपली हुकुमशाही प्रस्थापित करणें शक्य आहे. असें न होण्याची हमी फक्त त्या पक्षाच्या नैतिक जाणिवेवरच अवलंबून असते. तथापि व्यक्तिनिरपेक्ष पक्षयंत्रणेला नैतिक जाणीव असूं शकत नाही. यामुळे औपचारिक पार्लमेंटरी पद्धत ही हुकुमशाही अस्तित्वांत न येण्याची हमी देऊं शकत नाही. लोकशाही म्हणजे पक्षोपपक्षांचें राजकारण, त्यांचा सत्ताकलह या कल्पनेमुळे वरील चमत्कारिक परिस्थिति निर्माण झाली आहे. औपचारिक लोक-

शाहीपद्धतीने, लोकांच्या पाठिंब्याच्या आधारावर अस्तित्वांत आलेल्या हुकुमशाह्या आधुनिक इतिहासांत आढळतात. हिटलरला ९० टक्क्यांपेक्षा अधिक बहुमताने जर्मन लोकांचा पाठिंबा मिळाला होता. सनदशीरपणें अस्तित्वांत आलेल्या हुकुमशाह्यांचीं दुसरींहि अनेक उदाहरणें देतां येण्यासारखीं आहेत.

पार्लमेंटरी (संसदीय) लोकशाहींतील या स्पष्ट दिसणाऱ्या दोषां-मुळे ती खऱ्या अर्थीं लोकशाही व्हावी याकरितां प्रयत्न करण्यांत आले. तथापि, सुशिक्षित मतदारसंघावांचून लोकशाही संभवत नाही हें या प्रयत्नांच्या बाबतींत ध्यानांत घेतलें पाहिजे. त्यावांचून अशा प्रकारचा प्रयत्न, मग तो कितीहि प्रामाणिकपणें व निष्ठेने केलेला असो, यशस्वी होणें कठीण आहे. शेंकडों वर्षांपूर्वी प्लेटोने हा सिद्धान्त मांडला आहे. अर्थात् या बाबतींत शिक्षण या शब्दाचा रूढ किंवा तांत्रिक अर्थ अभिप्रेत नाही. बरीचशी उच्च सांस्कृतिक पातळी त्या शब्दाने सूचित केली जाते. त्यामुळे लोकांच्या ठिकाणीं स्वतंत्र विचार करण्याची कुवत निर्माण होऊं शकेल; विकारवश न होतां, केवळ भावनेच्या आवाहनांना बळी न पडतां ते विवेकपूर्ण निर्णय घेऊं शकतील. ज्या देशांत लोक-शाहीची ही प्राथमिक गरज थोड्याफार प्रमाणांत कां होईना पुरी झाल्याचे दिसते तेथे लोकशाही यशस्वी होण्याला वाव आहे. परंतु तेथे देखील सांस्कृतिक मागासलेपणा आणि अज्ञान यांच्या वातावरणांत वाढणारी आणि तें कायम राखणारी पक्षपद्धति लोक-शाहीस धोका निर्माण करीत आहे.

विशिष्ट राजकीय विचारानुसार पक्ष अस्तित्वांत येतात; आणि लोकांच्या कल्याणासाठीं विशिष्ट स्वरूपाचे क्रांतिकारक वा अन्य स्वरूपाचे सामाजिक कायदे करणें हा त्यांचा हेतू असतो. आपला कार्यक्रम प्रत्यक्ष व्यवहारांत आणण्यासाठीं पक्ष अधिकारारूढ झाला पाहिजे म्हणजे राज्ययंत्रावर त्याचा ताबा प्रस्थापित झाला पाहिजे, ही कल्पना पक्षसंघटनेच्या मुळाशीं आहे. यामुळे कोणत्याहि राजकीय पक्षाचें राज्यसत्ता काबीज करणें हें ताबडतोबीचें उद्दिष्ट बनतें. सत्ता काबीज करण्यासाठीं हिंसेचा आश्रय केलाच पाहिजे असें नाही. सत्ता “ काबीज करणें ” वा “ हस्तगत करणें ” अशा सारखे शब्दप्रयोग क्रांतिकारक पक्ष वापरतांना आढळतात. तथापि, सनदशीर मार्ग वा अहिंसा यांचा प्रचार करणाऱ्या पक्षांना देखील सत्ता हवीच असते. फक्त त्यांच्या प्रचारांत भाषेचा सौम्यपणा आढळतो. तात्पर्य, पार्लमेंटरी पद्धतीची लोकशाही ही अशा प्रकारें सत्तेच्या कलहाचें स्वरूप धारण करतें.

सामाजिक कल्याणाचें कोणतेंहि कार्य राजकीय सत्तेवांचून करतां येणें अशक्य आहे, हें एकदा गृहीत धरलें म्हणजे पक्षपद्धतीची अनिष्टता आपोआपच पतकरावी लागते. कांहीहि करावयाचें म्हटल्यास राज्ययंत्रांवरील ताबा ही त्यासाठीं प्राथमिक गरज बनते व त्यामुळे राज्यसत्ता मिळविण्यासाठीं कांहीहि करावयाची तयारी होते. साधन हेंच साध्यरूप बनतें आणि साध्याचा विसर पडतो. उच्च साध्यामुळे सर्व साधनें पुनीत होतात हा भ्रामक विचार

पुढे मांडण्याठींच काय ती साध्याची आठवण शिल्लक राहते. राजकारणांतील नैतिकता नष्ट होते. ज्याला सत्ता नको असेल त्याचा सामाजिक प्रश्नांशीं वा राजकारणाशीं संबंध उरलेला नाही, असें समजलें जातें.

कांही देशांत पार्लमेंटरी ( संसदीय ) पद्धतीच्या चौकटींत पुष्कळशी सामाजिक सुधारणा घडून आली हें खरें ! तथापि, या चित्राच्या दुसऱ्या बाजूकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. पोकळ औपचारिकतेच्या आवरणाखाली हुकुमशाही व झोटिंगशाही नांदू शकते. आणि सत्तेच्या केंद्रीकरणातून ती निर्माण होते. यामुळे सत्तेचें ( defusion ) वितरण वा विकेंद्रीकरण हेंच लोकशाहीचें सार होय. मतदारसंघाने आपली सार्वभौम सत्ता एखाद्या पक्षाच्या हवाली करावयाची; त्या पक्षाचे कांही सभासद पार्लमेंटमध्ये निवडून जावयाचे; त्यांच्यावर शिस्तीचीं बंधनें असायचीं आणि सरकारला त्यांनी नेहमीं पाठिंबा द्यावयाचा आणि त्यांतील मूठभर सभासदांचें प्रत्यक्ष सरकार बनायचें व त्याने सत्ता चालवायची. या पद्धतींत सद्‌हेतूंनी प्रेरित झालेल्या प्रामाणिक व्यक्ती सत्तास्थानीं येतील अशी कल्पनादेखील करणें कठिण आहे. यामुळे कितीहि चांगली असली तरी पार्लमेंटरी लोकशाही ही कल्याणकारी हुकुमशाहीच बनते; ती व्यक्तिस्वातंत्र्यावर बंधनें घालूं लागते आणि कल्याणकारी राज्य स्थापन करण्याच्या मिषाने आर्थिक जीवनाचें नियंत्रण सुरूं करते.

अन्य कारणास्तव चांगलीं माणसें देखील पक्षपद्धतीच्या योगाने बिघडतात. अधिकारस्थानावर ठराविक काळपर्यंतच राहता येतें आणि अल्पकाळांत विशेष कल्याणकारक कार्य कोणीहि करूं शकत नसल्यामुळे राजकारणी पुरुषांना दुसऱ्यांदा तिसऱ्यांदा पुन:-पुन: अधिकारस्थानीं येण्याची चिंता असते. याबाबतींतलें कौशल्य व साधनसामग्री भरपूर प्रमाणांत जवळ असलेला पक्ष कायम-चाच अधिकारपदावर राहूं शकतो. पक्षसंघटनेचें हें ध्येय साध्य करण्याच्या दिशेने प्रयत्न म्हणून आगामी निवडणुका जिंकण्या-कडे प्रत्येक पक्षाचें लक्ष असतें; आणि त्यासाठीं तो भंपकपणाचा अधिकाधिक अवलंब करूं लागतो. आधींच्या निवडणुकांत दिलेलीं आश्वासनें जरी त्याने पुरीं केलीं नसलीं तरी देखील आपण यशस्वी झालों असेंच त्यास म्हणावें लागतें; आणि खोट्याचें खरें करण्याचा खटाटोप अनिवार्य होतो. फसण्यासारखा मतदारसंघ नसेल तर आपणांस फारच थोडा काळ मिळाला, आणखी थोडा काळ मिळणें जरूर आहे, असा युक्तिवाद केला जातो. आपण चुकीचा कार्यक्रम पुढे मांडला होता, केलेल्या चुका सुधारण्याची आपणांस संधि दिली जावी, अशी कबुली देणाऱ्या पक्षाला यश मिळणें जवळजवळ अशक्यच असतें. अप्रामाणिक पद्धति व तशीं माणसें यांचा मुकाबला यशस्वीपणें करण्यासाठीं त्यांच्याच पातळीवर येऊन बोलावें लागतें. यामुळे आजच्या राजकारणाच्या व्यवहारांत भाग घेणारा कोणीहि

मनुष्य आपल्या वर्तनाच्या शुद्धतेविषयी निर्वाळा देऊं शकत नाही.

परंतु राजकीय व्यवहार ही एक सामाजिक गरज आहे. राजकीय संघटनेवांचून सामाजिक व्यवहार चालूं शकत नाही. राज्य हें नेहमीं राहणारच. म्हणून वेगळया प्रकारचा राजकीय व्यवहार संभवतो काय ? हा खरा प्रश्न आहे. वेगळया शब्दांत तो मांडतां येईल: सत्ताकलहापासून राजकारण मुक्त करतां येईल काय ? नेहमींच्या राजकीय चर्चेच्या मर्यादांत या प्रश्नाचें उत्तर देतां येणार नाही. नवा राजकीय व्यवहार हा नव्या सामाजिक तत्त्वज्ञानावरच आधारतां येईल, आणि मानवी स्वभावाचें निदान हा सामाजिक तत्त्वज्ञानांतील मूलभूत प्रश्न आहे. याहीपेक्षा पुढे जाऊन नव्या तत्त्वज्ञानाचीच उभारणी करावी लागेल. हा विचारार्ह प्रश्न आहे. राजकीय जीवनांतील अनिष्टता नाहीशी करावयाची असल्यास नवी जीवनदृष्टि स्वीकारणें आवश्यक आहे. रुढिनिष्ठ, नेमस्त, समाजवादी, साम्यवादी इत्यादि साऱ्या जुन्या विचारसरणी उघडपणें वा परिणामी समुदायवादीच आहेत. त्यांच्यांत व्यक्तीला कोठेंच स्थान नाही. कांही तिला प्रसंगविशेषीं मतदान करण्याचा अधिकार देतात, पण त्याचा सुबुद्धपणें उपयोग करणें अशक्य करून टाकतात. व्यक्ति समुदायांत अंतर्धान पावल्यानेंच स्वतंत्र होऊं शकते असें दुसरे कांही सांगतात. पहिल्या प्रकारचा विचार व्यक्तिस्वातंत्र्याचा औपचारिक उच्चार करतो, पण संस्थांना व्यक्ती-

पेक्षा अधिक महत्त्व देतो. तथापि, समुदाय ही अमूर्त कल्पना नव्हे, त्यांत मोडणाऱ्या स्त्रीपुरुषांचा मिळूनच तो समुदाय बनलेला असतो.

चांगलें वाईट, योग्य अयोग्य, यांत जोंवर व्यक्ति तारतम्य दाखवूं शकणार नाही वा निवड करूं शकणार नाही तोंवर चांगला समाज निर्माण होऊं शकणार नाही. सत्तेच्या राजकारणाची केवळ शिसारी येऊन उपयोग नाही. तें नको असल्यास लोकशाहीचीं मूलभूत तत्त्वें ध्यानांत ठेवणें जरूर आहे. सार्वभौमत्व सोडतां येत नाही. परंतु पक्षसंघटना लोकांना सार्वभौमत्वाचा त्याग करावयास लावतात आणि अशा प्रकारें लोकशाहीचा पायाच नष्ट करतात.

राजकीय व्यवहाराची शुद्धि करावयाची असल्यास पक्षपद्धति नष्ट झाली पाहिजे. सत्तेसाठीं झगडणारे पक्ष नाहीसे झाले म्हणजे राजकारण अनेक अनिष्ट गोष्टींपासून मुक्त होऊं शकेल. या सामान्य सिद्धान्ताच्या आधारावर नवी राजकीय विचारसरणी उभारणें शक्य आहे. आणि जिच्यांत लोकांचें राज्यावर प्रभावी नियंत्रण राहील आणि दैनंदिन राजकीय व्यवहारांत लोक प्रत्यक्ष भाग घेऊं शकतील अशी लोकराज्यानी घटनाहि तयार करतां येईल. असें राज्य हेंच खरेंखुरें लोकराज्य होय. स्वतंत्र समाजाची राजकीय घडण अशा प्रकारेंच होणें जरूर आहे.

यासाठीं प्रथम " सत्ता " या कल्पनेचा अर्थ निश्चित करणें जरूर आहे. सत्ता म्हणजे काय ? कृति करण्याचें सामर्थ्य म्हणजे

सत्ता असा अर्थ सांगतां येईल. आणि या अर्थाने मानवी समाजांत सत्तेला कायमचें स्थान राहणारच. तथापि, या सत्तेचें केंद्रीकरण होऊन जेव्हां बहुतेक सर्व समाज सत्ताहीन बनतो तेव्हां सत्तेची उपयुक्तता संपुष्टांत येते. राज्याच्या कार्याशीं सत्तेचा संबंध जोडला जात असल्याने राज्यसंस्थेची कल्पना स्पष्ट होणें उचित आहे. राज्यसंस्था ही जुलमाचें एक साधन असून समाजांतील वरिष्ठ गटाने किंवा वर्गाने इतरांवर अधिकार गाजविण्यासाठीं तें निर्माण केलें आहे, अशी व्याख्या अलिकडे कांही राजकीय विचारवंत करतात. आणि यांतूनच राज्यसंस्था अस्तित्वांत असे-पर्यंत योग्य व न्यायावर आधारलेली समाजरचना अस्तित्वांत येणें अशक्य आहे, असा उपसिद्धान्त निघाला आहे. यामुळे या विचारसरणींतून न्यायाधिष्ठित समाजरचना प्रस्थापित होतांच राज्यसंस्था लयाला जाईल ही कल्पना निघाली. राज्यसंस्थेची आवश्यकताच नाकारणारा हा अराजकवादी दृष्टिकोण हें साम्यवादी स्वप्नसृष्टीचेंच अतिरंजित स्वरूप होय.

राज्यसंस्थाविरहित समाज ही एक स्पष्टपणें दिसणारी तर्कदुष्ट कल्पना आहे. साम्यवादी समाजव्यवस्थेचें अत्यंत महत्त्वाचें वैशिष्टय म्हणजे राजकीय व आर्थिक सत्तेचें केंद्रीकरण हें होय. यांतून राज्यसंस्था लयाला कशी जाणार हा एक प्रश्नच आहे. साम्यवादाची स्थापना होण्यासाठीं सत्तेचें प्रचंड प्रमाणांत केंद्रीकरण व्हावें लागतें. समाज हा कधींहि न मिटणाऱ्या विरोधी स्वरूपाच्या

दोन वर्गांत विभागला गेला आहे; आजवरचा इतिहास हा वर्ग-युद्धाचाच इतिहास होय; असल्या अवास्तव, प्रत्यक्ष अनुभवांतल्या कसोटीस न उतरणाऱ्या कल्पनांतूनच हें अवास्तव स्वप्नरंजन जन्मास आलें आहे.

विविध हितसंबंध असणाऱ्या वर्गांमध्ये समाजाची विभागणी होणें हें एक ऐतिहासिक सत्य आहे. तथापि, त्याबरोबरच समाज-संस्थेंत सहकारशक्तीहि असतातच. एकमेकांपासून दूर नेणाऱ्या शक्तींचा प्रतिकार एकत्र आणणाऱ्या शक्तीच्या द्वारें होतो. या दोन शक्ती तुल्यबल झाल्याने सामाजिक जीवनांत स्थैर्य येतें; उलट, त्यांतील एखादीचेंच सामर्थ्य वाढून विसंवाद निर्माण झाल्यास हुकुमशाही वा झोटिंगशाही निर्माण होते किंवा सामाजिक विघटन होऊं लागतें.

एकत्र आणणाऱ्या सहकारी शक्तींच्या अभावी मानव समाज आजवर "बळी तो कान पिळी" या जंगली तत्त्वावर चालत राहिला असता. समाजसंस्थेच्या इतिहासांत या सहकारी शक्ती सातत्याने आढळतात; त्यांवाचून सांस्कृतिक विकास असंभवनीय आहे. या सहकारी सामाजिक शक्तींवर कलहप्रवृत्तींनी मात केल्या-मुळे जुन्या संस्कृति लयाला गेल्या. मध्ययुगीन व आधुनिक काळांत देखील अशाच अधून मधून क्रांत्या किंवा लढाया झालेल्या दिसतात. तथापि, या सर्व चढउतारांतून सामाजिक जीवनांतील समतोलपणा कायम राखीत सांस्कृतिक विकास एकंदरीने नव्या व उच्च पातळीवर गेल्याचेंच दिसून येतें.

या परस्परविरोधी शक्ती नाहीशा होऊन संवादित्वावर आधारलेली समाजव्यवस्था व आदर्श राज्यसंस्था निर्माण होईल अशी कल्पना आपण करूं शकतों. एकमेकांवर वर्चस्व गाजवूं पाहणारे वर्ग अशा समाजव्यवस्थेंत उरणार नाहीत. तथापि, समाजसंस्था राहणारच. आणि तिचें स्वरूप प्राथमिक दर्जाचें असणार नाही. उलट, तें कितीतरी विविध क्षेत्रांचें मिळून बनलेलें अत्यंत गुंतागुंतीचें स्वरूप असेल. मध्यवर्ती संघटनेवांचून अशा समाजाचा व्यवहार चालणें अशक्य आहे. ती सर्वंकष स्वरूपाची राज्यसंस्था असण्याचें कारण नाही. तथापि, विविध क्षेत्रांतील व संस्थांतील कार्यांत संवादित्व व सूत्रबद्धता निर्माण करणारी एक सामाजिक संस्था म्हणून तिची गरज अपरिहार्य आहे.

प्राथमिक समाजव्यवस्था अस्तित्वांत आल्यानंतर कालांतराने आत्मरक्षण करण्याच्या व जीवनकलह चालविण्याच्या हेतूने त्यांचें राजकीय संघटन झालें. दरम्यानच्या काळांतील मानवी विकासामुळे सामाजिक कार्यें वाढलीं; आणि निरनिराळया कार्यांच्या व व्यवसायांच्या आधारावर श्रमविभागणी झाली. या विविध क्षेत्रांत सूत्रबद्धता आणून सामाजिक कल्याण साधण्याच्या हेतूने राज्यसंस्था अस्तित्वांत आली. ती समाजावर लादली गेली नाही; किंवा तिचें स्वरूपहि सर्वंकष नव्हतें. सार्वजनिक व्यवहार चालविण्याचें साधन म्हणून तिचा जन्म झाला. निरनिराळया क्षेत्रांतील कार्यें शांततापूर्वक चालावींत याकरितां सुव्यवस्था राखणें, कायदे

करणें व त्यांची अंमलबजावणी करणें, हें तिचें कार्य होतें. निरनिराळया आर्थिक, शैक्षणिक, सांस्कृतिक क्षेत्रांतील अन्य स्वायत्त संघटनांप्रमाणेच राज्यसंस्था ही देखील एक स्वायत्त संघटना म्हणून जन्मास आली.

सामाजाच्या आर्थिक व्यवहारांत सरकार ढवळाढवळ करीत नसे, असा एक काळ होता. शेतकरी, कारागीर, व्यापारी इत्यादि वैयक्तिक वा सामुदायिक रीतीनें नैसर्गिक साधनसामग्रीचें स्वरूप बदलण्यांत आपली श्रमशक्ति खर्च करीत आणि समाजाच्या गरजा पुऱ्या करीत. व्यक्तिस्वातंत्र्य आणि शैक्षणिक व सांस्कृतिक संघटनांची स्वायत्तता अबाधित होती. राज्य त्यांत मुळींच ढवळा-ढवळ करीत नसें.

आजच्या केंद्रीभूत राजकीय जीवनामुळे प्राप्त होणारे आर्थिक फायदे इष्ट आहेत कीं नाहीत, हा प्रश्नच आहे. आणि म्हणूनच 'राज्यसंस्थाविरहित समाज होईल' किंवा 'राज्यसंस्था वठून जाईल' असल्या स्वप्नरंजनाला बळी न पडतां राज्यसंस्थेचें आजचें सर्वंकष स्वरूप कधीं काळीं नष्ट होणें शक्य आहे, अशी अपेक्षा आपण बाळगूं शकतों. तथापि, त्याकरितां राज्यसंस्थेचीं कार्यें ज्यायोगें कमीत कमी होतील असे मार्ग आपणांस शोधावे लागतील. राज्यसंस्थेला सार्वजनिक व्यवहार चालविण्याचें साधन म्हणून असलेलें तिचें मूळचें स्थान द्यावें लागेल; आणि तिचें कार्य विविध क्षेत्रांत सूत्रबद्धता आणण्यापुरतेंच मर्यादित करावें लागेल.

# सत्ता-आणि-पक्षविरहित राजकारण

समाजांत अनेक प्रकारच्या स्वायत्त संघटना असतात. राज्य-संस्था ही त्यांतीलच एक असून विविध क्षेत्रांतील कार्य नियंत्रित व सुसूत्रित करणें हीच तिची कामगिरी होय, अशा प्रकारचें समाजव्यवस्थेचें बहुसंस्थात्मक स्वरूप चित्रित करणारा सामाजिक विचारवंतांचा एक गट आहे. एकोणिसाव्या शतकांतील किमान राज्य करणारी राज्यसंस्थाच उत्कृष्ट होय; या उदारमतवादी तत्त्वांत हीच कल्पना अभिप्रेत होती. तथापि, त्यानंतरच्या काळांत सत्तेच्या केंद्रीकरणाची प्रवृत्ति बळावली. आणि त्यामुळे राज्यसंस्था ही खरोखरीच जुलमाचें साधन बनली, असें म्हटल्यास अति-शयोक्ति होणार नाही. तथापि, हा परिपाक सत्तेचा नसून सत्तेच्या केंद्रीकरणाचा आहे. आणि म्हणून लोकशाही राजकीय व्यवहारां-तील खरा प्रश्न म्हणजे सत्तेचें वितरण वा विकेंद्रीकरण हा होय. राजकीय क्षेत्रापुरतेंच बोलावयाचें झाल्यास हा विशेष गोंधळांत पाडणारा प्रश्न नसेलहि. परंतु अर्थव्यवस्थेंतील केंद्रीकरण आणि त्यायोगें झालेली राज्यसत्तेची वाढ यांच्या योगानें तो अधिक कठिण बनला आहे. म्हणून अधिक पृथक्करण केल्यास आजच्या समाजांतील आर्थिक व्यवहाराचें विकेंद्रीकरण करणें शक्य आहे काय? हाच खरा प्रश्न असल्याचें दिसून येईल. आणि त्यांतून राज्यसत्तेचें विकेंद्रीकरण शक्य आहे काय? हा प्रश्न निघतो. आधुनिक जगापुढील हाच खरा प्रश्न होय. आणि आजवर जें होत आलें त्याचा दाखला देऊन या प्रश्नाचें उत्तर

सांपडणार नाही. मानवी विचारशक्ति आता पुढे जाऊं शकत नाही, मानवी शहाणपणाची कमाल मर्यादा यापूर्वींच गांठली गेली आहे, हा दैववादी दृष्टिकोण मान्य केल्यास मानवी विकासक्रम आता संपुष्टांत आला आहे, यापुढचें भवितव्य विशेष आशादायक नाही, सामाजिक विघटनेकडेच आपण जाणार आहोंत, असें म्हणावें लागेल. मानवी कर्तृत्व, प्रगमनशीलता व विकासशीलता अशा प्रकारें नाकारल्यास "बळी तो कान पिळी" हें केवळ कायद्याचेंच नव्हे तर नीतीचें तत्त्व देखील होऊन बसेल. अशा प्रकारच्या जंगली नियमावर आधारलेलें समाजजीवन कशा प्रकारचें होईल याची केवळ कल्पनाच केलेली बरी !

सत्ताकलहाच्या वेदीवर मानवी स्वातंत्र्याचा बळी दिला जाऊं नये अशी इच्छा असल्यास राजकीय व्यवहारांतून पक्षसंघटना कशा नाहीशा होतील आणि त्यांच्यांवाचून तो व्यवहार कसा होऊं शकेल याबद्दल विचार करणें जरूर आहे. कारण, पक्षसंघटनाद्वाराच राजकीय सत्ता अल्पसंख्यांकांच्या हातीं केंद्रीभूत होते आणि तिचा दुरुपयोग वा खोट्या आवरणाखालीं गैर उपयोग होण्याची शक्यता निर्माण होते. केंद्रीकरणाचें हें साधन नष्ट झाल्यावांचून हवेंसें वाटणारें विकेंद्रीकरण होऊं शकणार नाही. लोकांची सार्वभौम सत्ता ज्या योगें त्यांच्याच हातीं राहील, असें नवें साधन पक्षसंघटनांऐवजी शोधून काढणें जरूर आहे.

# सत्ता-आणि-पक्षविरहित राजकारण

लोकशाही राजकीय व्यवहारासाठीं राजकीय पक्षसंघटना आवश्यक आहेत असा विश्वास जोंवर कायम राहील तोंवर मूठभर लोकांच्या हातीं सत्तेचें केंद्रीकरण होणें अपरिहार्य आहे. यामुळे पक्षपद्धतींत फारतर कल्याणकारी हुकुमशाहीचीच अपेक्षा संभवते; अशा प्रकारच्या हुकुमशाहीचें देखील आदर्शीकरण करणें शक्य आहे. परंतु ती कधींहि प्रत्यक्षांत आली नाही हें मात्र एक ऐतिहासिक सत्य होय.

आजच्या समाजांत चारित्र्यवान् व्यक्ती आहेत. तथापि, राजकीय व्यवहाराचें आजचें स्वरूप पाहून त्या व्यक्ती त्यापासून दूर राहतात. सत्ताकलहांत भल्याभल्यांचेंहि चारित्र्य नष्ट होतें याची जाणीव असल्यामुळे त्यांत पडण्याचें त्या टाळतात. तथापि, याचा अर्थ सार्वजनिक प्रश्नांविषयी त्यांना आस्था नसते असा मात्र नव्हे. विशेष गाजावाजा न करतां लहानसहान अनेक गोष्टी त्या सतत करीत असतात. आणि समाजाचें नीतिधैर्य पूर्णपणें नष्ट न होण्याला त्यांचीच तपश्चर्या कारणीभूत ठरते. राजकीय जीवनांतील घाण नष्ट करावयाची झाल्यास त्यांतून प्रथम सत्तालालसा घालविली पाहिजे. सत्तेच्या समान विभागणीवर आधारलेलें शासनयंत्र राजकीय व्यवहाराची शुद्धि करूं शकेल. आणि व्यक्तीचें प्राथम्य मान्य केल्यानेच अशा खऱ्याखुऱ्या लोकशाही शासनयंत्राची उभारणी करतां येईल.

लोकशाहीच्या चुकीच्या विचारसरणीमुळे फसवा व्यवहार होऊं लागला; आणि लोकशाहीचा भक्कम पाया निर्माण करण्यासाठीं

आवश्यक असलेला अवकाश त्या व्यवहारांत मिळूं शकला नाही, यामुळे लोकशाही बदनाम झाली आहे. तिच्यांत भंपकगिरीला उत्तेजन मिळालें. ज्यांना लांचलुचपत व अन्य अनिष्टांपासून मुक्त असलेला राजकीय व्यवहार हवा असेल त्यांनी लोकशाहीचा पाया घालण्याच्या कार्याला प्रारंभ करणें जरूर आहे. वैयक्तिक स्त्रीपुरुषांना आपल्या व्यक्तिमत्त्वाची जाणीव झाली पाहिजे; विवेकपूर्ण व तारतम्याने आपल्यापुढील राजकीय व नैतिक प्रश्नांवर निर्णय घेण्याच्या आपल्या सामर्थ्याचा त्यांना प्रत्यय आला पाहिजे. असें झालें तरच कालांतराने विकारांना आणि हीन भावनांना आवाहन देऊन त्यांना हलवून सोडण्याचें राजकीय कार्यकर्त्यांचें सामर्थ्य नाहीसें होईल. आणि अधिकाधिक मतदार, पक्षांचीं निवडणुकींच्या प्रसंगीं दिलीं जाणारीं अभिवचनें खरीं कीं खोटीं हें तपासून पाहण्यास समर्थ बनतील. मोठमोठ्या लोकसंख्येच्या राज्यांत प्रत्यक्ष लोकशाहीचा व्यवहार कसा करावयाचा, आधुनिक जगांत लोकशाहीव्यवहार शक्य आहे काय, या गोंधळांत पाडणाऱ्या प्रश्नाचें उत्तर या मार्गानेच सांपडणें शक्य आहे. खरी लोकशाही ही प्रत्यक्ष लोकशाहीच असली पाहिजे. अप्रत्यक्ष लोकशाही सत्तादानावर आधारलेली आहे. आणि या सत्तादानामुळे लोकांचें सार्वभौमत्व गमावलें जातें. असहाय, अणुवत् व्यक्तींऐवजी लहानलहान संघटित लोकशाह्यांच्या आधारावर लोकसत्ताक राज्याची उभारणी

झाली तरच खरीखुरी लोकसत्ता अस्तित्वांत येऊं शकेल. लोकशाहीचें अशा प्रकारें विकेंद्रीकरण केल्याने सत्तेचें केंद्रीकरण होणार नाही. आणि इतर स्वायत्त सामाजिक संस्थांच्या कार्यांत सूत्रबद्धता आणणें एवढेंच शासनयंत्राचें काम राहील.

या कार्याला फार मोठा कालावधि लागेल, असा एक सामान्य आक्षेप घेतला जातो. परंतु, एकदा निर्णय करून या दिशेने कार्यास प्रारंभ केल्यास, वाटतो तितका काळ लागण्याचें कारण नाही. यासाठीं मानवी स्वभावाबद्दलची परंपरागत कल्पना सोडण्याची पूर्वतयारी मात्र पाहिजे. मनुष्य हा स्वभावत:च सज्जन वा दुष्ट नसून तो जात्या बुद्धिनिष्ठ आहे; योग्य ती संधि मिळाल्यास स्वतंत्रपणें विचार करण्याचें सामर्थ्य प्रत्येक माणसाच्या ठिकाणीं आहे; खरेंखोटें यासंबंधीचा निर्णय तो घेऊं शकतो व त्या निर्णयानुसार वागूंहि शकतो. मनुष्य निसर्गत:च जर बुद्धिनिष्ठ विचार व नैतिक आचार करण्यास समर्थ नसेल तर युक्त, न्याय्य आणि संवादी समाजजीवन निर्माण होण्याची आशा बाळगणें व्यर्थ होय. आज सामान्य माणसें निरक्षर आहेत; राज्यकारभार चालविण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नाही, हें खरें आहे. परंतु त्यांना स्वातंत्र्य दिल्यास अगदीं अडाणी शेतकरी देखील आपला व्यवहार आजच्या सरकारपेक्षा अधिक चांगला चालवूं शकतो असें दिसेल हेंहि खरें आहे. आपला व्यवहार चालविण्यास सामान्य माणसें असमर्थ आहेत, ही एक त्यांच्या नांवाने सत्ता

हातीं घेण्यासाठीं आणि त्यांचें स्वातंत्र्य नष्ट करण्यास्तव तिचा उपयोग करण्यासाठीं सांगण्यांत येणारी सामान्य सबब होय.

निवडणुकीच्या वेळीं सर्व पक्ष लोकांकडे जातात आणि अभिवचनें देतात; यांतील निम्मी अभिवचनें देखील पुरीं करतां यावयाचीं नाहीत, हें त्यांना माहीत असतें. पण त्याबरोबरच मतदारांना हें समजत नाही म्हणून त्यांना सहज बनवितां येईल, हेंहि ते जाणून असतात. ही परिस्थिति बदलतां येणार नाही काय? येईल. किंबहुना, कोणालाहि स्वार्थरहित हेतूने राजकारणांत पडावयाचें झाल्यास अशा तऱ्हेचा बदल ही पहिली महत्त्वाची गरज आहे. केवळ लोकांचीं मतें मिळविण्यासाठींच त्यांच्याकडे गेलें पाहिजे, असें नाही. त्यांना बुद्धिपुरस्सर मतदान करण्याची कुवत यावी, याकरितां त्यांच्याकडे जाणें हें कितीतरी अधिक महत्त्वाचें कार्य आहे. निरनिराळया पक्षांचीं अभिवचनें, तीं पुरीं होण्याची शक्यता आणि पुरीं केलीं गेल्यास त्यामुळे परिस्थितींत होणारी प्रत्यक्ष सुधारणा हीं सर्व तपासून पाहण्यास मतदारांना प्रवृत्त केलें पाहिजे. तथापि, या व्यवहारांत मानवी स्वभावाविषयी अगदीं भिन्न कल्पना गृहीत धरली आहे, हें बुद्धीस आवाहन असून मनुष्याच्या बुद्धिनिष्ठतेवर तें आधारलेलें आहे. आजचा राजकीय व्यवहार, माणसें स्वतंत्र विचार करूं शकत नाहीत या कल्पनेवर आधारलेला आहे; आणि त्यामुळे पक्ष वा नेते यांचें अनुयायित्व पतकरण्याचा मार्ग तो दाखवितो. लोक, पक्ष आणि

नेते यांच्यांतील हा अस्वाभाविक पारस्परिक संबंध पक्षनिष्ठ राजकारणाचा आधार आहे; आणि त्यामुळे या राजकारणांत लोकांची विचारशीलता वाढीस लागूं शकत नाही. केवळ सत्तेसाठीं कलह इतकाच राजकारणाचा अर्थ रहात नाही. सर्व अनिष्ट व्यवहार व वर्तनक्रमांतील जणुं चढाओढच त्यांत आढळून येते.

आजची परिस्थिति ही एखाद्या दुष्ट चक्रासारखी वाटणें शक्य आहे. यांतून बाहेर पडण्यासाटीं मार्ग नाही असें नाही; परंतु तो पक्षनिष्ठ राजकारण करणारांना मानवणारा नाही; कारण त्या राजकारणाचा त्यांत अंत आहे. बुद्धीला आवाहन, हा तो मार्ग होय. आणि आधुनिक विज्ञानाने त्याचें स्वरूप दाखविलें आहे. मानवी स्वभाव श्रद्धा ठेवणें हा नसून प्रश्न विचारणें, चौकशी करणें, हा आहे असें विज्ञान सांगतें. म्हणजे मनुष्य हा बुद्धिनिष्ठ प्राणी आहे. मानवाची ही बुद्धिनिष्ठता अत्यंत खोलवर दडलेली आहे हें खरें ! तथापि, मानवी स्वभावाचें तें सार असल्यामुळे ती पुन: जागृत करणें शक्य आहे. या मार्गाविषयी बौद्धिक विश्वास व त्याचप्रमाणे वागण्याचें मनोधैर्य कांही लोकांच्या अंगीं तरी निर्माण झालीं पाहिजेत. म्हणजे ते राजकीय व्यवहार बुद्धिवादी व विवेकाच्या पातळीवर आणण्याच्या प्रयत्न करतील. विवेकशीलतेला हें आवाहन असून त्याला योग्य उत्तर मिळेल याबद्दल मला तरी संशय वाटत नाही. आणि हें नवें राजकारण अनेकांच्या कल्पनेपेक्षा कितीतरी लवकर फलद्रूप होऊं शकेल.

मात्र सत्ता हें त्याच्या यशाचें गमक नव्हे; उलट, ती केन्द्रीभूत स्वरूपांत नष्ट होणें हेंच त्याचें मोजमाप होय. स्वातंत्र्य आणि लोकशाही यांचा भक्कम पाया थोडीशीं माणसें देखील घालूं शकतील. मात्र त्यासाठीं त्यांनी सत्ता सोडली पाहिजे; सत्तेसाठीं होणाऱ्या कलहांत भाग घेतां कामा नये. लोकांजवळ मतांची याचना करण्याऐवजीं मतदारांना आपलें व्यक्तिमत्त्व आणि विचार करण्याचें व निर्णय घेण्याचें सामर्थ्य यांची जाणीव निर्माण करून देण्याचा त्यांनी प्रयत्न केला पाहिजे.

या मार्गानेच मतदार अधिकाधिक चिकित्सक व तारतम्यशील बनतील. आणि अखेरीस सर्व पक्षांच्या उमेदवारांस बाजूस सारून आपणांतूनच दोन निवडणुकींच्या दरम्यानच्या काळांत आपणांस जबाबदार राहतील अशीं लायक माणसें निवडून काढतील. असें होण्यास फार काळ लागण्याचें कारण नाही. आणि एकदा असें झालें म्हणजे पक्षपद्धतीचा काळ संपुष्टांत आला असें समजावें. पक्षाबरोबरच सत्तेच्या केंद्रीकरणाचें मुख्य कारणहि नाहीसें होईल. आणि स्थानिक लोकशाह्यांवर आधारलेल्या विकेंद्रित राज्ययंत्राचा पायाहि घातला जाईल. आपापल्या स्थानांत राज्याचीं सर्व कार्यें या लोकशाह्या पार पाडूं शकतील. राज्याचें सांस्कृतिक जीवन, अर्थव्यवहार व राजकीय संघटना यांचें स्वरूप या लोकशाह्यांच्या कार्यावरूनच निश्चित होईल. सत्ता ही खऱ्याखुऱ्या अर्थानें त्यांच्याच हातीं राहील

आणि तिचा त्यांतील सभासद प्रत्यक्ष उपयोग करूं शकतील. अशा स्थानिक लोकशाह्यांच्या व्यापक पायावर आधारलें गेल्यामुळे राज्ययंत्र हें खऱ्या अर्थाने लोकसत्ताक होईल. सत्ता काबीज करण्याची शक्यता त्यांत शिल्लक राहणार नाही. राजकीय व आर्थिक क्षेत्रांतील सत्तेचें केंद्रीकरण टाळून आधुनिक बहुसंस्थात्मक समाज-व्यवस्थेची उभारणी करणें अशा प्रकारें शक्य आहे.

जोंवर सत्ता काबीज करणें हाच राजकीय जीवनाचा हेतु आहे तोंवर पक्षोपपक्षांवांचून चालावयाचें नाही. परंतु सत्ता काबीज करण्याची इच्छा एकदा सोडली म्हणजे पक्षांवांचून राजकारण करणें शक्य आहे. पक्षसंघटना नसल्या कीं सत्तादानाचा राजकीय व्यवहार संभवत नाही. त्याचप्रमाणे केंद्रीभूत सत्तेची सनदशीर मान्यताहि नाहीशी होते. असें केल्यानेच व्यक्तिस्वातंत्र्य अबाधित राखणारा मुक्तसमाज निर्माण करणें शक्य होईल. ती संवादी समाजरचना असेल. सामाजिक स्वातंत्र्य, कल्याण व सुबत्ता म्हणजे समाजांतील स्त्रीपुरुषांना प्रत्यक्षपणें व्यक्तिशः उपभोगावयास मिळणारें स्वातंत्र्य, कल्याण व सुबत्ता असाच अर्थ तिच्यांत लावला जाईल.



# नवमानवतावादाचीं बावीस सूत्रें

## : १ :

### १

मानव हाच समाजसंस्थेचा मूळ आदर्श आहे. सामाजिक सहकार्याचे संबंध, व्यक्तींच्या प्रसुप्त शक्तींचा विकास करतात. परंतु, व्यक्तिविकास हाच समाजप्रगतीचा खरा मापक होय. ' समुदाय, समुदाय ' असें म्हणावयाचें तर त्याच्या आधीं व्यक्ती असल्या पाहिजेत. सामाजिक विमोचन व प्रगति हीं साधतांना जर स्वातंत्र्य आणि स्वास्थ्य यांचा प्रत्यक्ष अनुभव व्यक्तिव्यक्तीला मिळत नसेल तर विमोचन व प्रगति हीं आभासमयच राहतात, तीं कधींच साध्य व्हावयाचीं नाहीत. ज्याला स्वास्थ्य म्हणतात तें जर खरेंखुरें असेल तर तें व्यक्तीला भोगतां आलें पाहिजे. मानवसमाजाच्या ( राष्ट्र, वर्ग अशा ) कोणत्याहि संघटनेला सामुदायिक आत्मा असतो हें म्हणणें अयोग्य आहे. कारण या तत्त्वाच्या पोटीं व्यक्तींच्या बलिदानाचें तत्त्वच अभिप्रेत आहे. व्यक्तींच्या हितानेच सामुदायिक हिताची साधना होत असते.

## २

स्वातंत्र्याची अन्वेषणा आणि सत्याचा शोध यांनी मानवी प्रगतीची जी मूलभूत प्रेरणा ती घडविली आहे. स्वातंत्र्याची अन्वेषणा ही काय आहे? तर बुद्धि व भावना यांच्या उच्चतर अशा पातळीवर जगावें म्हणून शरीरपिंडाची चाललेली झटापट होय. आणि सत्याचा शोध हें काय आहे? तर यांतूनच निघणारा तो एक आवश्यक असा उपसिद्धान्त आहे. निसर्गाचें ज्ञान ज्या मानाने वाढतें त्या मानाने मनुष्य निसर्गाच्या जुलमांतून आणि भौतिक व सामाजिक बंधनांतून क्रमाक्रमाने मुक्त होत जातो. सत्य म्हणजे ज्ञानाचा गाभा होय.

## ३

सतत वाढत्या प्रमाणांत स्वातंत्र्य प्राप्त करून घ्यावें हाच व्यक्तिगत किंवा सामुदायिक अशा तर्कशुद्ध मानवी प्रयत्नांचा हेतु असतो. व्यक्तींच्या ठायीं वसत असणाऱ्या शक्तींच्या विकासावरील बंधनांचा सतत वाढत जाणारा निरास म्हणजेच स्वातंत्र्य होय. व्यक्ती म्हणजे मानवी प्राणी होत हें ओळखलें पाहिजे. ते कांही सामाजिक संस्थेच्या महायंत्रांतील खिळे किंवा ठोकळे नव्हेत. म्हणूनच व्यक्तीचें समाजांतील स्थान हें, कोणत्याहि प्रकारच्या सामाजिक संस्थेच्या आणि सामुदायिक प्रयत्नांच्या मधील प्रगतीचें व स्वातंत्र्यप्रवणतेचें उद्दिष्ट मोजण्याचें साधन होय.

समाजघटकांच्या प्रत्यक्ष हितावरून कोणत्याहि सामुदायिक प्रयत्नांचें यश मोजलें पाहिजे.

## ४

मनुष्य स्वभावत:च बुद्धिप्रधान आहे. कारण नियमबद्ध निसर्गाच्या कुशींतूनच तो उदय पावला आहे. बुद्धि हाहि जीवधर्मच असल्यामुळे माणसाची इच्छाशक्ति बुद्धीशीं मुळीच विरोधी नाही. बुद्धि आणि भावना यांचा उद्गम जीवाच्या एकाच समान अवस्थेंतून झाला आहे, असें जीवशास्त्रदृष्टया म्हणता येतें. म्हणून ऐतिहासिक नियतिवादाचा इच्छास्वातंत्र्याच्या सिद्धान्ताशीं विरोध नाही; तो त्याच्यांतच अंतर्भूत होऊं शकतो. एवढेंच नव्हे, तर मानवी इच्छाशक्ति हा इतिहासाचा एक अत्यंत प्रभावी आणि निर्णायक भाग आहे. तसें नसतें तर नियमबद्ध अशा इतिहासक्रमांत मनुष्यनिर्मित क्रांत्यांना स्थानच राहणार नाही. इतिहासाचा क्रम परमेश्वरी संकेतानेच पूर्वनिश्चित झालेला असतो या धार्मिक सिद्धान्ताशीं बुद्धिवादी व शास्त्रशुद्ध अशा नियतिवादाची गल्लत करतां कामा नये.

## ५

इतिहासाची आर्थिक उपपत्ति भौतिकवादा-( Materialism ) च्या चुकीच्या अर्थावर आधारलेली आहे. भौतिकवाद हें अद्वैती तत्त्वज्ञान आहे आणि वरील उपपत्तींत तर

द्वैतवाद सूचित होतो. *

इतिहासाचा क्रम कार्यकारणांच्या नियमांनी बद्ध आहे. परंतु तो अनेकविध कारणांनी घडत असतो. या कारणांमध्ये मानवी इच्छाशक्ति हा एक महत्त्वाचा भाग आहे. आणि आर्थिक हेतूंशीं तिचा साक्षात् संबंध नेहमींच जोडतां येत नाहीं.

## ६

कल्पनांची निर्मिति ही देहाची क्रिया होय; ती परिस्थितीच्या जाणिवेमुळे घडत असते. परंतु एकदा कल्पना अथवा विचार निर्माण झाले म्हणजे ते पृथक्पणें राहतात; आणि त्यांचा व्यापार त्यांच्या स्वतंत्र नियमांनीच चालतो. विचारांचा विकासक्रम सामाजिक विकासक्रमाबरोबर पावलें टाकतो आणि

---

* मार्क्सवाद हा भौतिकवादी आहे. परंतु तो आर्थिक उपपत्तीला वरिष्ठत्व देतो, ही विसंगति आहे. कारण भौतिकवादाप्रमाणे मन व बुद्धीसुद्धां भौतिकच होत. इतिहासाच्या क्रमांत त्यांची परिणामकारकता मानलीच पाहिजे. केवळ आर्थिक परिस्थितीच परिणामकारक मानल्यास मन वा बुद्धि भौतिक शक्तीपेक्षा भिन्न आहे असें मानल्यासारखें होतें. म्हणजे भौतिक शक्ति व आत्मशक्ति असे दोन भाग किंवा तत्त्वें मानावीं लागतात, व त्यामुळे भौतिकवादाचें खंडनच होतें आणि द्वैत मानावें लागतें. मार्क्सचा भौतिकवाद अद्वैती असल्यामुळे त्याच्या विचारसरणींतील इतिहासशास्त्रावर हा दोष येतो. – **अनुवादक.**

त्यांचा परस्परांवर प्रभाव पडत असतो. परंतु ऐतिहासिक घटना आणि विचारांचें आंदोलन यांचा प्रत्यक्ष कार्यकारणभाव, मानवांच्या समग्र विकासक्रमाच्या एका विशिष्ट बिंदूच्या ठिकाणीं घडत असल्याचें निश्चित करतां येत नाही [ विचार या शब्दाचा अर्थ तत्त्वज्ञानदृष्ट्या महत्त्व असलेला ध्येयवाद किंवा विचारसरणी असा येथे गृहीत धरला आहे. ] आर्थिक व्यवस्थेच्या प्रस्थापित सांगाड्यावर उभारलेला वैचारिक डोलारा म्हणजेच संस्कृतीचे आकृतिबंध आणि नैतिक मूल्यें होत हें खरें नव्हे. संस्कृति व नैतिक मूल्यें यांनाहि विशिष्ट ऐतिहासिक नियम आहेत, आणि त्यांचा इतिहास विचारेतिहासाच्या तर्कशास्त्राने बद्ध असतो.

७

स्वातंत्र्याचें नवें जग निर्माण करण्यासाठीं क्रांतीने समाजाच्या आर्थिक पुनर्घटनेच्या पलीकडे गेलें पाहिजे. दलित आणि पिळलेल्या वर्गाच्या नांवाने राजकीय सत्ता हस्तगत करून उत्पादनांच्या साधनांची खाजगी मालकी नष्ट केली म्हणजे स्वातंत्र्ययुगाचें आगमन आपोआपच होतें असें नाही.

८

कम्युनिझम् किंवा समाजवाद हें स्वातंत्र्यध्येयाच्या सिद्धीचें साधन होऊं शकतें अशी कल्पना करतां येते. परंतु त्यामुळे तें कितपत साध्य होतें ही गोष्ट मात्र अखेरीस अनुभवाने पड-

ताळून पाहिली पाहिजे. राष्ट्र किंवा वर्ग या नांवाचा एखादा सामुदायिक स्वरूपाचा ‘ अहंकार ’ श्रेष्ठ आहे असें मानून हाडा-मांसाच्या प्रत्यक्ष मानव-प्राण्याला जर डावलून टाकलें तर, जी राजकीय पद्धति आणि जो आर्थिक प्रयोग केल्याने हें साधतें त्या पद्धतीने किंवा प्रयोगाने स्वातंत्र्यसिद्धीचें सोयीस्कर साधन उपलब्ध झालें असें होत नाही. कारण, एक तर स्वातंत्र्याचा नाश स्वातंत्र्या-कडे नेतो असें म्हणणें हें असमंजस आहे. आणि दुसरें असें कीं केवळ काल्पनिक अशा सामुदायिक ‘ अहंकार ’-देवतेच्या स्थंडिलावर व्यक्तीचा बळी देणें म्हणजे स्वातंत्र्य खास नव्हे ! स्वातंत्र्याचें ध्येय ही एक पोकळ तात्त्विक कल्पना आहे असें म्हणून त्या ध्येयास अमान्य करणारें आणि व्यक्तीचें सार्वभौमत्त्व त्याज्य ठरविणारें जें कोणचें सामाजिक तत्त्वज्ञान असेल किंवा अशी जी कोणची सामाजिक पुनर्घटनेची योजना असेल, त्याच्या किंवा तिच्या अंगीं प्रगतीचें किंवा क्रांतीचें बल अत्यंत अल्पच राहणार; याहून तिला जास्त किंमत नाही.

## ९

राज्यसंस्था म्हणजे समाजाची राजकीय संघटना होय. कम्यु-निझम्‌मध्ये ही राज्यसंस्था क्रमाक्रमाने आपोआप विरून जाते, हें आदर्श-स्वप्न अनुभवान्तीं मिथ्या ठरलें आहे. सामाजिक मालकीच्या उद्योगधंद्यांवर अधिष्ठित अशा आर्थिक नियोजनांना जबरदस्त राजकीय यंत्राची आवश्यकता असते. परंतु या यंत्रावर

लोकसत्तेचेंच नियंत्रण असलें तरच या नव्या समाजव्यवस्थेंत स्वातंत्र्याची निश्चिति राहील. लोकसत्ता आणि वैयक्तिक स्वातंत्र्य यांच्याच पायावर आर्थिक नियोजन उभें करतां आलें तरच जनतेच्या गरजा भागविण्यासाठींच उत्पादन हा हेतु सिद्धीस जाऊं शकेल.

१०

धंद्यांचें राष्ट्रीयीकरण व आर्थिक नियोजन यांच्यामुळे कामगारांची पिळवणूक आपोआप थांबेल किंवा त्यामुळे संपत्तीची समविभागणी खात्रीने होते असें नाही. जर आर्थिक लोकशाही आली नाही तर ज्याप्रमाणे राजकीय लोकशाही प्रस्थापित व्हावयची नाही, त्याप्रमाणेच जर राजकीय लोकशाही आली नाही तर आर्थिक लोकशाहीहि प्रस्थापित व्हावयाची नाही.

११

एकदा हुकुमशाही प्रस्थापित झाली म्हणजे ती कायमच राहूं पाहते. कामाचा उरक, सामुदायिक प्रयत्न आणि सामाजिक प्रगति यांच्या सबबीवर राजकीय हुकुमशाहीच्या छत्राखाली चालणारें आर्थिक नियोजन हें व्यक्तिस्वातंत्र्याची अवहेलना करतें. त्याचा परिणाम असा होतो कीं, समाजवादी समाजांत उच्च प्रकारची लोकशाही प्रस्थापित होते, अशी जी हल्लीं कल्पना आहे ती अशक्य ठरते. हुकुमशाही ही स्वतःच्या घोषित ध्येयांना हरताळ फासत असते.

## १२

पार्लमेंटरी डिमॉक्रसीचीं म्ह० प्रतिनिधि-प्रधान संसदीय लोकशाहीचीं वैगुण्यें देखील अनुभवांतीं उघड झालीं आहेत. सत्ता प्रतिनिधींच्याकडे सोंपविल्यामुळे हीं वैगुण्यें उद्‌भवतात. लोकसत्ता खरीखुरी प्रभावी करावयाची तर, सत्ता ही नेहमीं निरपवादपणें जनतेच्या हातींच स्थिरावली पाहिजे; व सार्वभौम सत्ता जनतेलाच, अधूनमधून नव्हे तर सतत व दैनंदिन, प्रभावी-पणें वापरतां यावी यासाठीं उपाययोजना झाली पाहिजे. कणाकणा-प्रमाणे एकमेकांपासून विलग असलेल्या नागरिक व्यक्ती बहुधा नेहमींच प्रत्यक्षांत असमर्थ बनून राहिलेल्या असतात. आपलें सार्वभौमत्व अंमलांत आणण्याचें व राज्ययंत्रावर सतत ताबा चालविण्याचें आवश्यक असें कोणतेंहि साधन त्यांच्यापाशीं नसतें.

## १३

प्रतिनिधिप्रधान लोकशाहींत उदारमतवादाला नकलीपणा येतो, त्याचें विडंबन होत असतें. माणसांनी माणसांची जी पिळवणूक चालविली आहे तिला कायदेशीरपणा आणण्याचें काम खुल्या व्यापाराच्या तत्त्वाने उदारमतवाद करीत आला आहे. तो वाद तिच्यावर शिक्कामोर्तब करतो. अर्थ हा मानवाचा एकमेव पुरुषार्थ आहे ही कल्पना, व्यक्तिवादाच्या विमोचक तत्त्वाला निष्प्राण करते. अर्थप्रधान मनुष्य एकतर गुलाम तरी असतो किंवा गुलामांचा धनी तरी असतो. “ अर्थ हा एकच पुरुषार्थ ”

ही ग्राम्य कल्पना बुडविली पाहिजे, आणि तिच्याजागीं मनुष्य हा स्वभावत:च बुद्धिप्रधान आहे ही प्रत्ययास येणारी कल्पना रूढ केली पाहिजे. मनुष्य हा बुद्धिप्रधान असतो म्हणून तर नीतिविचारी असतो. नीति म्हणजे विवेकबुद्धीला आवाहन होय. आणि विवेकबुद्धि म्हणजे परिस्थितीची साहजिक जाणीव आणि परिस्थितीला अनुसरून होणारी प्रतिक्रिया होय. बुद्धीच्या पातळीवर घडणारी जीवपिंडाची यांत्रिक क्रिया म्हणजे विवेकबुद्धि, आणि म्हणूनच विवेकबुद्धि बुद्धिनिष्ठ असते.

## १४

प्रतिनिधिप्रधान लोकशाहीचा पर्याय [alternative] हुकूमशाही मात्र खास नव्हे. आधुनिक समाजपद्धतींतील तुटक अतएव दुर्बल अशा व्यक्तींच्या प्रतिनिधिप्रधान लोकशाहीच्या स्थानीं संघटित लोकशाही स्थापणें हाच त्याचा पर्याय होय. देशभर स्थापिलेल्या जनसमित्यांचें जाळें विणून सुसंघटित लोकसत्ता अस्तित्वांत आणली पाहिजे व या लोकसत्तेच्या पायावर पिरॅमिडच्या धर्तीवर निमुळता होत जाणारा मनोरा उभारून त्या सुस्थिर मनोऱ्याचें शिखर या दृष्टीनें संसद् अस्तित्वांत आली पाहिजे. अशा रचनेने समाजाची राजकीय संघटना ( राज्य ) सर्व समाजाशीं एकरूप होईल आणि याचाच परिणाम म्हणजे राज्यावर लोकसत्तेचें निरंतर नियंत्रण राहील.

## १५

मानव हाच स्वत:च्या विश्वाचा शिल्पकार आहे या मूलभूत ऐतिहासिक सत्यावर भर देणें हें क्रांतिकारक व विमोचक अशा सामाजिक तत्त्वज्ञानाचें मुख्य कार्य आहे. मानव हा विचार-शील प्राणी आहे व ही विचारशीलता, तो व्यक्तित्वसंपन्न राहिला, तरच दिसून येईल. मेंदू हें उत्पादनाचें साधन असून तें अत्यंत क्रांतिकारक माल निर्माण करतें. क्रांत्या होण्याकरितां त्यांना रूढ कल्पनांचा विध्वंस करणाऱ्या विचारांची पूर्वतयारी लागते. ज्यांना आपल्या सर्जनशील आत्मशक्तीचा प्रत्यय आलेला आहे, विश्वाची नवरचना करण्याच्या दुर्दम्य इच्छाशक्तीनें जे प्रेरित झाले आहेत, साहसी विचारांनी जे गतिमान् झाले आहेत आणि स्वतंत्र मान-वांचा बनलेला स्वतंत्र समाज निर्माण करणाऱ्या ध्येयाच्या ध्यासाने जे चेतले आहेत असे संख्येने सतत वाढत जाणारे लोकच, लोकशाही नांदेल, अशी परिस्थिति निर्माण करूं शकतात.

## १६

सामाजिक प्रगतीचें मूलभूत तत्त्व पुन: निश्चितपणें मांडून त्याच्या पायावरच सामाजिक क्रांतीची पद्धति व कार्यक्रम यांची उभारणी केली पाहिजे. खंबीर आणि व्यापक प्रयत्न करून लोकांना स्वातंत्र्याचीं तत्त्वें आणि बुद्धिवादी व सहकार्यप्रधान राहणी यांचें शिक्षण देणें हाच सामाजिक नवजीवन निर्माण करण्याचा मार्ग आहे. क्रांतीनंतर जी व्यवस्था निर्माण करावयाची तिचा

सामाजिक व राजकीय पाया घालण्यासाठीं जनतेच्या कार्यक्षम अशा लोकशाही संघटना तयार कराव्या लागतील. नवजीवनाचें रहस्य आत्मसात् केलेल्या लोकांच्या संख्येंत त्वरेने वाढ करणें आणि जनतासमित्यांचा जलद प्रसार करणें, तसेंच या दोहोंत सजीव एकसूत्रीपणा निर्माण करणें या गोष्टींची सामाजिक क्रांतीला आवश्यकता आहे. त्याचप्रमाणे स्वातंत्र्य, बुद्धिवाद आणि सामाजिक संवादित्व या तत्त्वांवर क्रांतीच्या कार्यक्रमाची उभारणी झाली पाहिजे. सामाजिक जीवनाच्या नियंत्रणांत सर्व प्रकारची मक्तेदारी व पक्षपाती हितसंबंध यांचें निर्मूलन करणें हा या कार्यक्रमाचा अर्थ आहे.

## १७

मनुष्याने मनुष्याची पिळवणूक करणें अशक्य करण्यासाठीं समाजाची आर्थिक पुनर्घटना करणें हें मूलगामी लोकसत्तेंत अर्थात् गृहीत धरावेंच लागतें. समाजांतील घटक व्यक्तींच्या बौद्धिक व इतर सूक्ष्म शक्तींचा आविष्कार होण्याकरितां अगोदर त्यांच्या भौतिक गरजांची चढत्या प्रमाणांत तृप्ति करणें ही आवश्यक गोष्ट आहे. राहणीचें मान सतत वाढत राहील, याची हमी घेणारी आर्थिक पुनर्घटना हा मूलगामी लोकसत्तेचा पाया आहे. आर्थिक बंधनांतून जनतेची मुक्तता करणें हें तिला स्वातंत्र्याच्या ध्येयाप्रत नेण्याचें आवश्यक साधन आहे.

## १८

उत्पादन हें उपयोगासाठींच करावयाचें आणि त्याची वांटणी मानवी गरजा भागविण्याच्या दृष्टीने करावयाची या तत्त्वांवर नव्या समाजरचनेचें अर्थशास्त्र उभारलें पाहिजे. या समाजरचने-च्या राजकीय संघटनेंत प्रतिनिधींच्या हातीं सत्ता सुपूर्द करण्यांत येणार नाही; कारण तसें केल्याने व्यवहारांत लोकांच्या हातीं प्रभावी सत्ता अजिबात राहात नाही. जनता-समित्यांच्या द्वारा वयांत आलेले सर्व लोक राज्यकारभारांत प्रत्यक्ष भाग घेऊं शकतील, अशा पद्ध-तीवरच ती राज्यघटना आधारली पाहिजे. ज्ञानाचा सार्वत्रिक प्रसार आणि कमींत कमी नियंत्रणें ठेवून वैज्ञानिक सर्जनशील प्रवृत्तींना व प्रयत्नांना अधिकाधिक वाव व प्रेरणा देणें, या गोष्टींवर नव्या समाजरचनेची संस्कृति उभारली जाईल. बुद्धि व विज्ञान यांवर हा नवा समाज आधारलेला असल्यामुळे त्यांत नियोजन हें अपरिहार्यपणें येतेंच. परंतु व्यक्तीचें स्वातंत्र्य हा मुख्य उद्देश ठेवूनच हें नियोजन केलें जाईल. हा नवसमाज राजकीय, आर्थिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या लोकसत्ताप्रधान राहील आणि म्हणूनच स्वतःचें संरक्षण करण्यास पूर्णपणें समर्थ अशीच लोक-सत्ता तो निर्माण करील.

## १९

बुद्धीवरील बंधनें तोडून टाकून आत्मिक दृष्ट्या स्वतंत्र झालेलीं माणसें स्वातंत्र्याचें जग निर्माण करण्याच्या दृढ

निश्चयाने जेव्हां एकत्रित होतील, तेव्हांच त्यांच्या सामुदायिक प्रयत्नांनी मूलगामी लोकसत्तेचें ध्येय साध्य होईल. ते भावी काळांतील राज्यकर्ते म्हणून नव्हे तर जनतेचे मार्गदर्शक, मित्र व तत्त्वज्ञ या नात्यानेच कार्य करतील. त्यांचें राजकीय वर्तन व कार्य बुद्धिप्रधान आणि म्हणूनच नैतिकहि राहील; कारण त्याखेरीज तें स्वातंत्र्याच्या ध्येयाशीं सुसंगत राहणार नाही. ज्या प्रमाणांत जनतेची स्वातंत्र्याकांक्षा वाढीस लागेल, त्या प्रमाणांतच त्यांचे प्रयत्नांत वाढ होईल. आणि सुजाण लोकमत व लोकांचा ज्ञानयुक्त प्रयत्न यांच्या साहाय्याने प्रत्यक्ष लोकशाहीचें राज्य होईल. सत्तेचें केंद्रीकरण आणि स्वातंत्र्य यांच्यांत परस्पर विसंगति आहे; याची जाणीव असल्यामुळे सर्वत्र विकेंद्रीकरण करणें हा त्यांचा उद्देश राहील.

## २०

मौलिक पृथक्करण करून पाहिलें तर असें दिसून येईल कीं व्यक्तिस्वातंत्र्यावर आक्रमण न करतां सर्वांची प्रगति व भरभराट करणारी सामाजिक रचना ही नागरिकाला शिक्षण देण्यावरच अवलंबून असते. स्थानिक जनसमिति हें नागरिकत्वाच्या आणि राजकारणाच्या शिक्षणाचें नागरिकांचें विद्यालयच होईल. अनासक्त अशा व्यक्तींना समाजकार्याची धुरा वाहण्यास समर्थ करील अशीच लोकराज्याची रचना व कार्यपद्धति असेल. अशा अनासक्त व्यक्तींच्या हातीं असलेलें राज्ययंत्र हें एका विशिष्ट

वर्गाच्या हातीं सांपडलेलें इतरांवर जुलुम करण्याचें साधन म्हणून राहणार नाही. ज्यांच्या आत्म्यावरील बंधनें छिन्न झालीं आहेत, तीं सत्तारूढ माणसेंच गुलामगिरीच्या शृंखला उच्छिन्न करून सर्वांना स्वातंत्र्याचा लाभ करून देऊं शकतील.

## २१

हा 'रॅडिकॅलिझम्' म्हणजे मूलगामीवाद विज्ञानास समाज-संघटनेचें अंग बनवितो, व्यक्ति आणि समाज यांतील विसंगति नष्ट करतो आणि स्वातंत्र्याच्या कल्पनेंत नैतिक, बुद्विवादी आणि समाजपरायणतेचा आशय भरतो; विचारांची गतिमीमांसा ( Dynamics of Ideas ) आणि आर्थिक नियतिवादाचा विरोधविकास ( The Dialectics of Economic Determinism) यांचा योग्य परमार्श ज्यांत घेतलेला आहे अशा प्रकारचें सामाजिक तत्त्वज्ञान 'रॅडिकॅलिझम्'–मूलगामीवाद पुढे ठेवतो. याच तत्त्वज्ञानांतून वर्तमानकालांतच घडावयाच्या समाज-क्रांतीची पद्धति आणि कार्यक्रम यांची निष्पत्ति होते.

## २२

'मानव हाच हरएक गोष्टींचा मानदंड आहे' (प्रोटॅगोरस) किंवा 'मानव हाच मनुष्यजातीचा उगम आहे' ( मार्क्स ) या सिद्धान्तापासून 'रॅडिकॅलिझम्'ला–मूलगामीवादाला प्रारंभ होतो, आणि आध्यात्मिक दृष्टया विमुक्त आणि नीतिशील मानवांच्या सामुदायिक प्रयत्नांनी जगाची "स्वतंत्र मानवांचें एकराज्य व बंधुसमूह" या स्वरूपांत पुनर्घटना झाली पाहिजे, असें तो वाद प्रतिपादन करतो.

---

# नवमानवतावादाचें आचरण

## : १० :

[ कलकत्ता येथे ता. २६–२९ डिसेंबर, १९४९ रोजीं भरलेल्या अ. भा. रॅडिकल डेमोक्रॅटिक पक्षाच्या परिषदेंत मान्य झालेली समीक्षा व कार्यक्रम ]

१. दोन वर्षांपूर्वी भरलेल्या रॅडिकल डेमोक्रॅटिक पक्षाच्या गेल्या अखिलभारतीय परिषदेंत नवमानवतावादाच्या बावीस मूलतत्त्वांचा स्वीकार करण्यांत आला. दुसऱ्या महायुद्धानंतर जग संकटमय परिस्थितींत सांपडल्यासारखें दिसत आहे. या संकटांतून बाहेर पडण्याचा मार्ग सांपडावा या हेतूने हीं तत्त्वें आणि त्यावरून निघणारीं राजकीय जीवनासंबंधीचीं अनुमानें पुढे मांडण्यांत आलीं होतीं. मानवजातीवरील संकटाचीं दोन वर्षांपूर्वी दृष्टिगोचर झालेलीं मुख्य लक्षणें आता अधिकच प्रामुख्याने व स्पष्टपणें पुढे आलीं आहेत. या प्रश्नाचें स्वरूप अणि तो सोडविण्याचा मार्ग या विषयी दोन वर्षांपूर्वी घेण्यांत आलेले निर्णय या मधल्या काळांतील प्रत्यक्ष अनुभवाने यथार्थ ठरले आहेत.

२. जागतिक अरिष्टाचें स्वरूप आणि त्याची उग्रता यांचें स्पष्टीकरण करण्याच्या दृष्टीने नवमानवतावादाची तत्त्वें यथार्थ

ठरल्यामुळें त्यांचें आचरण या अरिष्टांतून बाहेर येण्यास साहाय्य करील असें म्हणतां येतें. नवमानवतावाद प्रत्यक्ष आचरणांत आणतां येईल कीं नाही या विषयी संशय व्यक्त केले जातात. पण हे संशय म्हणजे ज्या रोगावर नवमानवतावादाचें आचरण हाच इलाज त्याच रोगाचीं लक्षणें होत. हे संशय उद्भवण्याचें मुख्य कारण म्हणजे राजकीय जीवन आणि राजकीय कार्य यांबाबत अनेकांच्या मनावर असलेला परंपरागत कल्पनांचा पगडा हें होय. यांतूनच सामान्य जनतेकडे या ना त्या राजकीय पक्षाच्या हातचीं साधनें म्हणून पाहण्याचा दृष्टिकोण जन्मला आहे.

३. परंपरागत राजकारणांत प्रगतीची शक्यता उरलेली नाही. ज्या परिस्थितीला अनुलक्षून त्या राजकीय विचार व आचारांची योजना केली गेली ती परिस्थितीच आज उरलेली नाही. भांडवलशाही ही आता आपल्या गुणांच्या आधारावर पाठिंबा मिळविणारी स्थिर समाजव्यवस्था राहिलेली नाही. जगांतील अनेक भागांत ती कोलमडून पडली आहे. आणि सगळीकडे तिचें नैतिक अधिष्ठान नाहीसें झालें आहे. यामुळे उद्भवलेल्या सामाजिक अस्थैर्यातून नवीनच परिस्थिति निर्माण झाली आहे. एकीकडे अनेकांना जीवनांतील अशाश्वततेमुळे, राष्ट्र किंवा वर्ग यांच्या नांवाने गाजविल्या जाणाऱ्या सर्वंकष हुकुमशाहीच्या विचार-सरणीविषयी आकर्षण वाटत आहे. समुदायांत विलीन होऊन आपणांस सुरक्षितता व सामर्थ्य लाधेल या खोट्या कल्पनेमुळे

आपण स्वतंत्र विचार करणारीं माणसें आहोंत, ही जाणीवहि टाकून देण्यास ते तयार होत आहेत. दुसरीकडे भांडवलशाही कोलमडूं लागल्यामुळे उत्पादनसाधनांच्या मालकांकडून यशस्वी राजकीय पक्षांच्या नेत्यांकडे सामाजिक नेतृत्व झुकूं लागलें आहे. या क्रमांत आणखीहि एका घटकाची भर पडली आहे. स्पर्धेवर आधारलेली भांडवलशाही नष्ट होऊं लागल्यामुळे राज्याने आर्थिक व्यवहारांत ढवळाढवळ न करण्याच्या तत्त्वाऐवजीं राज्यद्वारा होणाऱ्या आर्थिक नियोजनाचा मार्ग पुढे येऊं लागला आहे. आर्थिक नियोजनामुळे राज्याचें कार्यक्षेत्र व सत्ता वाढते. राज्ययंत्र ताब्यांत असणाऱ्यांच्या हातीं अत्यंत मोठी सत्ता केंद्रीभूत होते. आणि या सत्तेच्या राजकारणाचें मोठें आमिष म्हणजे बलाढ्य हुकुमशाहीची स्थापना हें होय.

४. भांडवलशाहीचें युग संपुष्टांत येऊन त्याऐवजीं सत्तेच्या राजकारणाच्या युगाला प्रारंभ झाला आहे असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति नाही. आता राजकीय जीवनांत भांडवलशाहीचे पुरस्कर्ते आणि विरोधक असे दोन गट पडतांना दिसत नाहीत. उलट, हुकुमशाही प्रस्थापित करण्याच्या इच्छेने प्रेरित झालेल्या शक्तींचेच दोन तट पडले आहेत. हुकुमशाही ‘ डावी ’ कीं ‘ उजवी ’ याचें परिणामाच्या दृष्टीने फारसें महत्त्व नाही. स्वातंत्र्य, लोकशाही आणि सामाजिक कल्याण यांच्या दृष्टीने दोन्ही सारख्याच अनिष्ट म्हटल्या पाहिजेत. म्हणून भांडवलशाही कीं

समाजवाद हा आजचा खरा प्रश्न नसून सत्तेच्या राजकारणांतून उद्भवणारी हुकुमशाही कीं लोकशाही हाच खरा प्रश्न आहे. म्हणूनच या परिस्थितींत राजकारणाच्या परंपरागत कल्पनांचा त्याग करणें जरूर आहे. लोकशाही राजकारणाचें आता निराळेंच स्वरूप कल्पिलें पाहिजे.

५. समाजवादी कार्यक्रमावर आधारलेले 'डावे' पक्ष लोकशाहीचा दावा करतात खरा; परंतु ते आजच्या अरिष्टांतून बाहेर पडण्याचा मार्ग दाखवीत नाहीत. पहिली गोष्ट अशी कीं उत्पादन, विभागणी आणि विनिमय यांच्या साधनांचें राष्ट्रीयीकरण करण्याची मागणी करणें म्हणजे आजच्या मूळ मध्यवर्ती प्रश्नाकडे डोळेझांक करणें होय. लोकशाही प्रत्यक्षांत आणणें हा आजचा खरा प्रश्न होय. या दृष्टीने आजच्या बदललेल्या परिस्थितींत या "डाव्या" पक्षांची मागणी आणि "उजव्या" पक्षांचा कार्यक्रम यांत विशेष फरक उरत नाही. राज्याच्या हस्तक्षेपावांचून चालणारी खाजगी भांडवलशाही आता टिकूंच शकत नाही. यामुळे "उजवे" पक्ष देखील राज्यानेच आर्थिक नियोजन करावें अशी भाषा बोलूं लागले आहेत. याचा अर्थ उत्पादन, विभागणी आणि विनिमय यांच्या साधनांवरील नियंत्रण त्यांनाहि हवें आहे. राज्याच्या नियंत्रण-नियोजनाचे हे दोन्हीहि पुरस्कर्ते आपल्या कार्यक्रमांत अंतर्भूत असलेल्या सत्तेच्या केंद्रीकरणावर कांहीच उपाय सांगत नाहीत. दोहोंनाहि प्रातिनिधिक लोकशाही हवी आहे, पण

त्या लोकशाहींत तर मूठभर प्रतिनिधींच्या हातांत सत्तेचें केंद्रीकरण होतें आणि जनतेचें सार्वभौमत्व केवळ औपचारिक बनतें. राज्यावर जनतेचा खराखुरा ताबा असल्यावांचून अर्थव्यवस्थेंतील राज्याच्या नियंत्रणाला विमोचक महत्त्व प्राप्त होऊं शकत नाही. म्हणूनच प्रातिनिधिक लोकशाहीवर श्रद्धा ठेवणारा समाजवाद हा राज्याधिष्ठित भांडवलशाहीपेक्षा फारसा भिन्न राहणार नाही.

६. " डाव्या " आणि " उजव्या " पक्षांच्या कार्यक्रमांतील या साम्यापेक्षाहि त्यांच्या प्रत्यक्ष राजकीय आचरणांतील साम्य अधिक महत्त्वाचें आहे. सत्तेच्या कलहांत पडल्यामुळे लोकशाही-वरील निष्ठेशीं अगदीं विसंगत असलेल्या साधनांचा उपयोग दोघेहि करतात. लोकप्रियता मिळावी म्हणून जनतेचे खुळचट पूर्वग्रह सांभाळून घेण्याकडे आणि सांस्कृतिक व राजकीय मागासले-पणांतून निर्माण झालेली हुकुमशाहीस अनुकूल अशी जी परंपरा तिला उत्तेजन देण्याकडे दोहोंचीहि प्रवृत्ति आढळते. जनता विवेकशील, आत्मविश्वासयुक्त असेल तरच लोकशाही नांदू शकते. परंतु या उलट दोन्ही पक्ष हुकुमशाहीस पोषक अशाच जनतेच्या भावनांचा उपयोग करतांना दिसतात. " वर्ग " या समुदायवादी आवाहनाबरोबरच " राष्ट्र " हें सर्वंकष स्वरूपाचें आवाहन दिलें जातें; म्हणून समाजवादी शेवटीं राष्ट्रवादाचेच पुरस्कर्ते बनतात. निरनिराळया पक्षांचे राजकीय कार्यक्रम आणि प्रत्यक्ष आचरण यांत अशा प्रकारें विशेष फरक न राहिल्याकारणाने त्यांच्यांतील कलहाला

सत्तेच्या कलहाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. यामुळे निरनिराळ्या देशांतून हुकुमशाही शक्तींची वाढ झाली असून आजचें जग हें भयानक लष्करी संग्रामाच्या कड्यावर येऊन पोहोंचलें आहे.

७. सत्ता पुढे आम्ही वाटून देणार आहोंत या हेतूने केलेली सत्तासंपादनाची धडपड हीहि शेवटीं मूळ हेतुसिद्धीला विघातकच ठरते. कारण सत्तेच्या राजकारणाच्या आग्याड्यांत हुकुमशाहीला मोहक स्वरूप देण्यांत आणि वक्तृत्वबाजी, अंधश्रद्धा आणि विभूतिपूजा यांना आवाहन करण्यांत इतरावर ताण करणारा राजकीय पक्षच यशस्वी होऊं शकतो. आपली अंतर्गत घटना लोकशाही ठेऊन, लोकांशीं लोकशाही वृत्तीने वागून व त्यांना लोकशाही मार्गाने वळण लावून जर कोणी पक्ष जिंकू म्हणेल तर तें अशक्य आहे. यामुळेच कोणत्याहि पक्षाने एकदा सत्ता हस्तगत केली कीं सत्तेचें वितरण होणें अशक्यच आहे.

८. राजकीय हुकुमशाही वाढण्याच्या या काळांत निसर्गविषयक व सामाजिक तत्त्वज्ञानांत बुद्धिविरोधी व गूढ विचारसरणी वाढल्या आहेत. इतिहास आणि राज्यशास्त्र यांत पूर्वसिद्ध नियतीवर आधारलेले विचार पुढे येत आहेत. अज्ञान आणि असहायता यांनी मानवी सर्जनशीलतेवरील विश्वास दडपून टाकला आहे. ज्या युरोपीय नवजीवना-(Renaissance)च्या चळवळीनंतर अत्यंत अल्प काळांत मानवी स्वातंत्र्याच्या दिशेने विलक्षण प्रगति घडून आली, त्या चळवळीची मानवतावादी प्रेरणा

आता मागे पडली आहे. अशा प्रकारें पाश्चात्त्य राष्ट्रांत व्यक्ति-स्वातंत्र्य, बुद्धिवाद, मानवतावाद इत्यादि परंपरांपासून विन्मुक्त होण्याची प्रवृत्ति वाढत आहे. आमच्याकडील दैववादी व अंध-श्रद्धेच्या विचारसरणीमुळे अनेकांना ही प्रवृत्ति समाधान देते. कारण नवजीवनाची वैचारिक चळवळ इकडे झालीच नाही हें होय. याचाच एक सर्वसामान्य परिणाम असा झाला आहे कीं मानवाला आपणच निर्माण केलेलें विज्ञान व यंत्रतंत्र यांवर ताबा चालविण्याबाबत आत्मविश्वासच उरलेला नाही.

९. सामान्य माणसाला सार्वजनिक व्यवहार व्यवस्थितपणें चालवणें अशक्य आहे या समजुतींतूनच राजसत्तेऐवजीं प्रतिनिधींचें राज्य या कल्पनेचा उदय झाला. सत्ता प्रतिनिधींच्या हवालीं करण्या-च्या या पार्लमेंटरी पद्धतीमुळे जनतेचें सार्वभौमत्व नष्ट होतें. पार्ले-मेंटरी लोकशाहीस "डाव्या" गटाकरवी जो विरोध केला जातो त्या विरोधाचा आधार म्हणजे अल्पसंख्याकांनी सत्ता हस्तगत करून जनतेची आर्थिक परिस्थिति सुधारल्यावांचून लोकशाही नांदण्या-साठीं आवश्यक असलेला जनतेचा बौद्धिक आणि नैतिक विकास होणें अशक्य आहे हें वरवर दिसायला शास्त्रीय, पण अशास्त्रीय गृहीतकृत्य होय. या विचारांमुळे सत्तेच्या राजकारणाला मान्यता मिळते, आणि कल्याणकारी हुकुमशाहीचें समर्थन तयार होतें. परंतु एकदा प्रस्थापित झालेली हुकुमशाही कायमचेंच ठाण मांड-ण्याचा प्रयत्न करूं लागते. राज्यकर्ते आपल्या राज्याचा पाया

नाहीसा करणाऱ्या गोष्टी करीत नाहीत. आणि याचा परिणाम म्हणून सामान्य जनतेंत संपूर्ण असहायता निर्माण होते.

१०. मानवतावादी परंपरेला पुन्हां सामर्थ्यवान् केल्यानेच लोकशाहीची स्थापना शक्य होईल. मनुष्य हाच आपल्या विश्वाचा मानदंड होय. मानव स्वभावत:च बुद्धिप्रधान असल्यामुळे तो आपल्या अनुभवांतून शिकूं शकतो. आपलें जीवन सुधारण्याच्या धडपडींतच तो बौद्धिक आणि नैतिक मूल्यें निर्माण करतो. हें सामर्थ्य कांही अल्पशा लोकांच्या ठिकाणींच आहे किंवा राहणीच्या विशिष्ट पातळीवरच तें प्राप्त होतें असें नाही. समाधानकारक राहणी सांस्कृतिक विकासाला पोषक आहे हें खरें ! परंतु सांस्कृतिक विकासाच्या पूर्व कारणपरंपरेंतील तें एक आवश्यक अंग मानणें तर्कदुष्टतेचें द्योतक होय. ऐतिहासिक दृष्टीनेहि हें म्हणणें समर्थनीय नाही. जगण्याच्या धडपडींतूनच मानवी कर्तृत्वशक्ती देखील विकसित होत आल्या आहेत.

११. इतिहासांत महत्त्वाचे सामाजिक बदल होण्यापूर्वी वैचारिक – मानसिक विश्वांत क्रांति घडवून आणणारीं– बंडें झालीं असल्याचें आढळतें. राजकीय आणि आर्थिक स्वातंत्र्य प्राप्त करावयास लागणाऱ्या पूर्वपरिस्थितीचें मुख्य आवश्यक अंग म्हणजे मानसिक स्वातंत्र्य होय. आर्थिक दारिद्र्य, राजकीय जुलूम आणि सामाजिक अस्थैर्य यांनीं भरलेल्या वातावरणांत देखील परिस्थिति बदलण्याची इच्छा व सामर्थ्य निर्माण होऊं

शकतात. स्वातंत्र्यलालसा आणि स्वातंत्र्य मिळविण्याचें सामर्थ्य थोड्यांच्या ठिकाणींच आहे. आणि तेच नेतृत्व करण्यास योग्य होत ही कल्पना वैज्ञानिक मानवतावादास अमान्य आहे.

१२. सत्तेसाठीं झगडा करणारे राजकीय पक्ष हें स्वातंत्र्य-संपादनाचें साधन नव्हे ह्या रॅडिकल डेमोक्रॅटस्नी यापूर्वींच काढलेल्या निष्कर्षाला बळकटी आणणारेंच आजच्या ओढवलेल्या संकटाच्या मुख्य लक्षणांचें स्वरूप होय असें तीं तपासून पाहिल्यास दिसून येईल. नवमानवतावादी तत्त्वज्ञानाप्रमाणे चालणारी स्वातंत्र्य-चळवळ ही राजकीय चळवळीपेक्षा अधिक व्यापक असली पाहिजे. परंपरागत स्वरूपाचा राजकीय पक्ष तिचें संघटन व नेतृत्व करूं शकणार नाही. हें स्वातंत्र्याचें आंदोलन सत्ताकलहाच्या बाहेरच राहून लोकशाहींतील अभिप्रेत सांस्कृतिक मूल्यांचा प्रत्यय जनतेस करून देण्यासाठीं तिला आवश्यक शिक्षण देण्याचा प्रयत्न करील. नवी जीवनदृष्टि निर्माण करणें हें त्याचें मुख्य कार्य राहील. आणि भारतांतील आजच्या परिस्थितीचा विचार करतां बराच काळपर्यंत हेंच कार्य करावें लागेल. या कार्याच्या आधारेंच व्यापक स्वरूपाचें सत्तावितरण व्हावें यासाठीं आवश्यक त्या लोक-शाही संस्था निर्माण करण्याचा प्रयत्न ही चळवळ करील. चळ-वळीच्या वैचारिक भूमिकेचे परिणाम राजकीय व आर्थिक क्षेत्रा-पुरतेच मर्यादित राहाण्याचें कारण नाही. नवे सामाजिक संबंध आणि राजकीय संघटना निर्माण करण्यास उद्युक्त झालेल्या या

आंदोलनांतून नव्या विचारांचे स्त्रीपुरुषहि सर्वत्र निर्माण होऊं शकतील.

१३. शास्त्रशुद्ध राजकारण करीत असल्यामुळे गेल्या कित्येक दिवसांपासून रॅडिकल पक्षाचीच अशा व्यापक आंदोलनांत परिणति होत आहे. आरंभापासूनच या पक्षाने जनतेला राजकीय शिक्षण देण्याचा प्रयत्न केला; बुद्धिवादी प्रचार केला; आणि सत्तेच्या अभिलाषेनें आपल्या तात्त्विक भूमिकेस कधींच मुरड घातली नाही. पक्षाच्या अशा प्रकारच्या कार्यामुळे नवजीवनाच्या चळवळीचा पाया घातला गेला आहे. एखाद्या पक्षाच्या हातीं सत्ता देण्याऐवजीं लोक ज्यायोगें ती आपल्याच हातीं ठेऊं शकतील आणि दैनंदिन शासनकार्यांत प्रत्यक्ष भाग घेऊन ज्यायोगें राज्ययंत्रावर परिणामकारक ताबा ठेऊं शकतील अशा संघटित लोकराज्याची कल्पना पक्षाने पुढे मांडली आहे. प्रत्यक्ष लोकांच्या हातीं सत्ता न आल्यास स्वातंत्र्य नष्ट होतें या जाणिवेमुळे आपल्या वैचारिक भूमिकेशीं न जुळणारा व मुळांत परंपरागत राजकारणाच्या कल्पनांमधून स्वीकारलेला सत्तासंपादनाचा मार्ग पक्षाने सोडून दिला आहे. यामुळे हा पक्ष परंपरागत राजकीयपक्षकल्पनेच्या सांच्यांतून बाहेर पडला आहे.

१४. हा विकासक्रम पुढे नेण्याच्या हेतूने नवमानवतावादाच्या तत्त्वज्ञानाचें अधिष्ठान असलेली व्यापक सामाजिक चळवळ वाढविण्यासाठीं रॅडिकल प्रजातंत्रवादी नव्या पद्धतीनें संघटित होतील.

या चळवळीचें नांव " रॅडिकल मानवतावादी आंदोलन " असें राहील. यामुळे रॅडिकल्सच्या कार्यक्रमांत आणि दैनंदिन कार्यांतहि बदल होईल. त्याचप्रमाणे या नव्या नांवामुळे राजकीय पक्षाचे हेतू, कार्य व संघटना यांपासून मुक्त होऊन चळवळीचें व्यापक स्वरूप स्पष्ट होईल. रॅडिकल मानवतावादी चळवळीचें कार्य व प्रगति हीं यापुढे अनुयायांच्या संख्येवरून मोजलीं जाणार नाहीत; स्वातंत्र्यलालसा, बुद्धिवादी दृष्टिकोण आणि 'ऐहिक' विचारांवर आधारलेली नैतिकता यांचा जनतेंत कितपत प्रसार झाला आहे आणि राज्यसंस्थेवर या चळवळीचा किती परिणाम दिसून येत आहे यांवरच तीं अवलंबून राहतील.

१५. व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाच्या संपूर्ण विकासाच्या आड येणारीं आर्थिक, सांस्कृतिक इत्यादि सर्व कृत्रिम बंधनें अधिकाधिक प्रमाणांत दूर करीत जाणें हाच रॅडिकल मानवतावादी आंदोलनाचा कार्यक्रम राहील.

१६. पक्षाच्या गेल्या परिषदेंत संमत झालेलीं बावीस मूल सूत्रें आणि चार वर्षांपूर्वी रॅडिकल पक्षाने पुढे मांडलेला राज्यघटनेचा आराखडा यांमधून नव्या समाजरचनेंतील राजकीय संघटनेचें स्वरूप स्पष्ट करण्यांत आलें आहे. ही राजकीय संघटना म्हणजे सुसंघटित लोकशाही होय. या सुसंघटित लोकशाहींत सर्व लोकांचें, राज्याच्या कायदे करणाऱ्या व कार्यकारी अशा दोन्हीहि क्षेत्रांवर कायमची देखरेख व नियंत्रण राहील. जनता-समित्या

हा या नव्या राज्याचा पाया होय. या समित्या लोकशिक्षणाचें कार्य करणारीं विद्यालयेंच होत; त्याचप्रमाणे त्या लोकांचा सार्वभौम अधिकार प्रत्यक्षांत आणणारीं साधनें बनतील. या जनतासमित्यांच्या पायावर उभारलेल्या 'पिरॅमिड'चें सर्वांत वरचें शिखर म्हणून संसद् राहील. आणि आत्मिक स्वातंत्र्याचा प्रत्यय आलेले आणि बौद्धिक प्रामाणिकपणा व नीतिमत्ता यांनीं युक्त असलेले स्त्रीपुरुष प्रत्यक्ष राज्यकारभारांत भाग घेतील.

१७. या नव्या समाजांतील अर्थव्यवस्थेचें स्वरूप देखील स्पष्ट होणें जरूर आहे. व्यक्तिस्वातंत्र्याच्या आणि भरभराटीच्या हेतूने प्रेरित झालेली नियोजित अर्थव्यवस्था असें तिचें स्वरूप राहील. नफ्यासाठीं उत्पादन या तत्त्वाला तिच्यांत स्थान असणार नाही. त्याचप्रमाणे नियंत्रणाचें अनावश्यक केंद्रीकरणहि तिच्यांत येऊं शकणार नाही. ही अर्थव्यवस्था यंत्रतंत्रविषयक कार्यक्षमते-प्रीत्यर्थ व्यक्तिस्वातंत्र्याला धोका निर्माण होऊं देणार नाही. यामुळें ही अर्थव्यवस्था भांडवलशाही किंवा समाजवाद यांपैकीं कोणत्याहि प्रकारची न होतां ती निराळीच म्हणजे सहकारी अर्थव्यवस्था बनेल. उत्पादकांच्या आणि ग्राहकांच्या सहकारी संघटनांचें जाळें या अर्थव्यवस्थेंत असेल. आणि या संघटनांच्या द्वारा आर्थिक व्यवहार चालविण्याचें आणि त्यांत सूत्रबद्धता आणण्याचें कार्य लोकच करतील. ही सहकारी अर्थव्यवस्था आधु-निक विज्ञान आणि तंत्रविद्या यांचा पुरेपूर उपयोग करण्याचा

प्रयत्न करील. आणि सार्वजनिक उपयोगाच्या आणि सुखसोयीं-च्या द्वारें अतिरिक्त सामाजिक संपदेची न्याय्य वांटणी करील.

१८. समाजाचे मूल घटक ज्या व्यक्ती त्यांना व्यक्तिश: मौलिक स्वातंत्र्याचा प्रत्यक्ष उपभोग घेतां यावा या करितां कशाची गरज आहे हें लक्षांत घेऊनच या आंदोलनाचा राजकीय व आर्थिक कार्यक्रम निश्चित होईल.

१९. व्यक्तिस्वातंत्र्य आणि नीति यांच्या वातावरणांत नव्या समाजाचा सांस्कृतिक विकास होईल. विज्ञान आणि कला यांच्या विकासाचें नियमन राज्य करणार नाही. उलट, सर्व प्रकारच्या सर्जनात्मक प्रयत्नांना पूर्ण वाव व उत्तेजन मिळेल अशा प्रकारची परिस्थिति निर्माण करण्याचे राज्य प्रयत्न करीत राहील.

२०. नवमानवतावादाच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार करणें आणि तें तत्त्वज्ञान राजकीय, आर्थिक व इतर प्रश्नांना लागूं करून दाखविणें अशा प्रकारचें द्विविध कार्य हातीं घेऊन त्यायोगें नवें सांस्कृतिक जीवन निर्माण करणें हें या आंदोलनाचें आद्य कार्य राहील.

२१. आंदोलनाचा वैचारिक पाया शुद्ध व भक्कम राखण्यासाठीं रॅडिकल्सना आपल्या तत्त्वज्ञानासंबंधी सतत संशोधन करावें लागेल. आधुनिक विज्ञान व अनुभव यांच्या आधारें त्याची सतत समीक्षा करीत राहिलें पाहिजे. आणि समाज-जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत तें लागूं करीत राहिलें पाहिजे. त्याबरोबरच आजच्या जीवनाच्या गरजांशीं

असलेला या तत्त्वज्ञानाचा जिव्हाळ्याचा संबंध स्पष्ट करून त्याचा प्रसारहि केला पाहिजे. यासाठीं त्यांना लोकांत स्वातंत्र्य-लालसा जागृत करणें, लोकांचा आत्मविश्वास वाढविणें, लोकांच्या स्वावलंबी प्रवृत्तींचा परिपोष करणें, बुद्धिवादाची आणि धर्मनिरपेक्ष नीतीचीं मूल्यें प्रसृत करणें आणि जागतिक मानवतावादी दृष्टिकोण निर्माण करणें इत्यादि कामें करावीं लागतील. स्वतःच पुढाकार घेऊन जीवनांतील दैनंदिन प्रश्न आपल्याच प्रयत्नांनी कसे सोडवतां येतील याबद्दलचें शिक्षण लोकांना द्यावें लागेल. असें केल्यानेच लोकांतील दैववाद, अंधश्रद्धा, वैयक्तिक असहायतेची भावना इत्यादि हुकुमशाहीस पोषक असलेले दोष नष्ट होऊं शकतील. सर्व सामाजिक संस्था व परंपरा यांना मानवतेची कसोटी लावली जाईल.

२२. स्वयंप्रेरणेचें आणि सहकारी प्रयत्नांचें वातावरण निर्माण केल्यानंतर रॅडिकल्सनी लोकराज्याचे आद्य घटक म्हणून जनता-समित्या आणि सहकारी संघराज्याचे आद्य घटक म्हणून सहकारी संस्था यांची उभारणी करण्यासाठीं जनतेंत कार्य केलें पाहिजे. लोकशाही दृष्टिकोण सर्वत्र पसरला आणि या लोकशाही संघटना निर्माण होऊं लागल्या म्हणजे लोकांना राज्यकारभारावर अधिकाधिक प्रमाणांत ताबा चालवितां येईल. या कार्याला साहाय्य करण्यासाठीं निरनिराळ्या मतदारसंघांतील जनतासमित्यांना आपणांतील बुद्धिमान् व नीतिशाली माणसांना निवडणुकांसाठीं उमेदवार

म्हणून उभें करण्यास रॅडिकल्सनी उत्तेजन दिलें पाहिजे. या मार्गानेच खऱ्या लोकराज्याची आणि सहकारी अर्थव्यवस्थेची उभारणी होऊं शकेल. जनतासमित्यांचे सभासद म्हणून स्वातंत्र्यप्रिय, जबाबदार आणि तारतम्य-विवेकयुक्त अशीं माणसें येऊं लागलीं म्हणजे सार्वभौम लोकराज्यांतील प्रभुत्व-संपन्न प्राथमिक संघटनांचें स्वरूप या जनतासमित्यांना प्राप्त होईल. अशा प्रकारच्या जनतासमित्या सर्वत्र निर्माण झाल्यानेच खऱ्याखुऱ्या लोकराज्याची चैतन्यशील यंत्रणा तयार होऊं शकेल.

२३. हें कार्य करण्यासाठीं रॅडिकल्सना पुढील प्रकारचीं कामें मुख्यत्वेंकरून करावीं लागतील.

( अ ) रॅडिकल मानवतावादी आंदोलनाची संशोधनकार्य करणारी शाखा म्हणून इंडियन रिनेसान्स इंस्टिट्यूट कार्य करीत राहील. हें कार्य तत्त्वज्ञान, इतिहास, राजकीय व अर्थ-शास्त्रीय सिद्धान्त व अन्य सामाजिक शास्त्रें इत्यादि विविध क्षेत्रांत केलें जाईल. या संशोधनांतून निघालेले निष्कर्ष तपासून पाहण्यासाठीं आणि त्यांचा लोकांत प्रसार करण्या-साठीं या संस्थेच्या स्थानिक शाखाहि काढण्यांत येतील, आणि अशा ठिकाणीं या गोष्टींची विचारपूर्वक व हेतुपूर्वक चर्चा करण्यासाठीं लोक एकत्र येतील व चर्चा होतील.

( ब ) शैक्षणिक कार्य, सभा, चर्चा, साहित्य, रंगभूमि, सांस्कृ-तिक व अन्य संघटना इत्यादि द्वारा रॅडिकल्स :

## नवमानवतावादाचें आचरण

( १ ) लोकशाही समाजरचनेच्या राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक वगैरे विविध अंगोपांगांचीं मूलतत्त्वें यांचा प्रसार करतील, आणि अशा प्रकारची समाजरचना निर्माण करण्याची इच्छा जनतेंत जागृत करतील;

( २ ) वेळोंवेळीं निर्माण होणाऱ्या राजकीय, आर्थिक आणि सामाजिक समस्या या बुद्धिवाद आणि लोकशाही दृष्टिकोण यांच्या साहाय्यानें कशा सोडवाव्यात याचें मार्गदर्शन करतील; सरकार व जनता या दोहोंच्याहि पुढे त्या सोडविण्याचे मार्ग मांडतील आणि सत्तारूढांच्या कृतींचें विवेकपूर्वक मूल्यमापन करूं शकेल असें विवेकी सुबुद्ध लोकमत तयार करतील;

( ३ ) नागरिक स्वातंत्र्याची आवश्यकता स्पष्ट करून हुकुमशाहीच्या निदर्शक प्रवृत्ती व कृती यांचा विरोध करण्याचें लोकांना शिक्षण देतील;

( ४ ) आपल्या जीवनांतील परिस्थिति व विविध अंगें आपल्या स्वतःच्या प्रयत्नांनीच म्हणजे जनतासमित्या, सहकारी सोसायट्या, रात्रीच्या शाळा इत्यादि मार्गांनी कशीं सुधारतां येतील हें लोकांना समजावून सांगतील; आणि स्वावलंबनाच्या व सहकार्याच्या प्रवृत्ती जागृत ठेवतील;

(५) दैववाद, अंधश्रद्धा इत्यादि कल्पनांतील अपायकारकता स्पष्ट करतील, आणि बुद्धिवाद, स्वत्वाची जाणीव आणि धर्मनिरपेक्ष नैतिक मूल्यें हीं लोकांस समजावून सांगतील;

(६) जागतिक मानवतावादाचा प्रसार करतील, राष्ट्रवादांतील हुकुमशाही प्रवृत्तींची अपायकारकता स्पष्ट करतील आणि लष्करी वृत्तीचा विरोध करतील;

(७) अस्पृश्यता, जातिभेद व धर्मभेद आणि स्त्रियांचा समाजांतील कनिष्ठ दर्जा यांचा विरोध करतील;

(८) लोकशाही आंदोलनाचीं ध्येयें व कार्यें स्पष्ट करून चळवळीला अधिकाधिक कार्यकर्ते व साहाय्यक मिळवतील;

(९) वरील हेतूंनी पुस्तकें, नियतकालिकें इत्यादि प्रसिद्ध करतील आणि त्यांचा लोकांत वाढता प्रसार करतील.

(क) संघटनात्मक कार्य : लोकशिक्षणाचें कार्य केल्यामुळे रॅडिकल्सना

(१) नवमानवतावादाचा विद्यार्थी व शिक्षक यांच्यांत प्रसार करण्यासाठीं रॅडिकल विद्यार्थी व शिक्षक-संघटना काढतां येतील;

(२) याच हेतूने स्त्रियांचे क्लब्ज् काढतां येतील;

( ३ ) ट्रेड युनियन्स काढून त्यांना लोकशाही स्वरूप देण्यासाठीं त्यांचें कार्य प्रत्यक्ष कामगारांकडेच अधिकाधिक सोंपवितां येईल. केवळ मालकांशीं वेतनकरारार्थ सामुदायिकरीत्या प्रयत्न करणें एवढेंच या संघटनांचें कार्य न राहतां त्या सहकारी संस्था, रात्रीच्या शाळा इत्यादि कार्य हातीं घेऊन कामगारांत स्वावलंबन प्रवृत्तीची जोपासना करण्याचे प्रयत्न करतां येतील;

( ४ ) कामगारांच्या शिक्षणसंस्था व त्यांचे लहानलहान क्लब काढून त्यांच्यांत ज्ञानाचा प्रसार करतां येईल;

( ५ ) उत्पादकांच्या आणि ग्राहकांच्या सहकारी संघटना काढतां येतील;

( ६ ) शहरें व खेडीं या दोन्ही ठिकाणीं जनतासमित्या स्थापन करतां येतील. प्रचाराच्या योगाने लोकांच्या ठिकाणीं लोकशाही वर्तन आणि सहकारी प्रयत्न करण्याची वृत्ति निर्माण केल्यानंतरच या समित्या काढल्या जातील. संघटित लोकशाहीचीं तत्त्वें मान्य करणारांकरवीच अशा समित्यांचे सभासद निवडले जावेत. लोकांची परिस्थिति ज्यायोगें सुधारेल अशीं कामें हातीं घेणें आणि सरकारी धोरण व कायदे याबद्दल विवेकपूर्ण लोकमत तयार करणें हें या

समित्यांचें ताबडतोबीचें कार्य होय. आणि त्यांचा हेतु लोकांना आपलें खरेंखुरें सार्वभौमत्व हातीं घेण्यास समर्थ करणें हा होय. देशभर अशा समित्यांचें एक विशाल जाळेंच रॅडिकल्सना निर्माण करावें लागेल. नागरिकांना आपले राजकीय विचार मोकळेपणाने पुढे मांडण्याचें स्थान व सार्वभौम समाजसंघटनेचे घटक या दृष्टीने या समित्यांची वाढ होऊं लागली म्हणजे आजची राजकीय पक्षांची मक्तेदारी आपोआपच कमी होईल; नोकरशाहीस आळा बसेल आणि लोकांतील एकलेपणाची व असहायतेची भावना नाहीशी होण्यास मदत होऊं शकेल.

( ड ) निवडणुकी: निवडणुकींच्या वेळीं मतदारसंघांतील जनतासमित्यांच्या प्रतिनिधींची परिषद बोलावून बौद्धिक प्रामाणिकपणा, चारित्र्य आणि समाजसेवा या गुणांनी संपन्न असा जो माणूस त्यांना उत्तम वाटत असेल त्याची उमेदवारी त्यांना जाहीर करतां येईल. जनतासमित्यांच्या वतीने अशा उमेदवारांस निवडणूक लढवितां येईल. तो पक्षाचा उमेदवार असणार नाही. जनतासमित्यांनाच तो शेवटीं जबाबदार राहील.

# नवमानवतावादाचें आचरण

२४. नव्या स्वतंत्र लोकशाही समाजरचनेची उभारणी करूं पाहणारी चळवळ हीहि लोकशाही पद्धतीची आणि स्वतंत्र, बुद्धिवादी व चारित्र्यशील व्यक्तींकडून चालविली जाणें जरूर आहे. रॅडिकल मानवतावाद्यांनी स्वत: अशा प्रकारचीं मूल्यें आत्मसात् करून भावी स्वतंत्र समाजरचनेच्या या मूल्यांचा प्रसार केला पाहिजे. आपल्या ध्येयाचा आदर्श मूळ नमुना म्हणून ही चळवळ संघटित झाली पाहिजे. शब्दांपेक्षा प्रत्यक्ष कृति हीच अधिक योग्य होय या तत्त्वानुसार रॅडिकल्सचें प्रत्यक्ष वर्तन असलें पाहिजे. मनुष्य स्वभवत:च बुद्धिप्रधान असल्यामुळे स्वतंत्र आणि नीतिमान् बनू शकतो व म्हणून सामाजिक संघटना व्यक्तिस्वातंत्र्याशीं विसंवादीच असण्याचें कारण नाही, याचा प्रत्यक्ष साक्षात्कार आपल्या दैनंदिन जीवनांत आणि इतरांबरोबरच्या कार्यांत रॅडिकल्स-नी करून दिला पाहिजे.

२५. लोकशाही आंदोलन हें त्यांत सामील होणाऱ्या व्यक्तींच्या स्वयंस्फूर्त यत्नांना पूर्ण वाव देईल. या व्यक्ती नियमांनी एकत्र बांधल्या जाणार नाहीत. एकाच तत्त्वज्ञानाच्या मान्यतेमुळे त्या एकत्र येतील आणि त्यांच्यांत आध्यात्मिक – बौद्धिक व नैतिक भ्रातृत्व निर्माण होईल. त्यांचें कार्य स्वयंस्फूर्तीनेच आपापलें सामर्थ्य व प्रवृत्ती यांच्या अनुसार होत राहील. जीवनाच्या सर्व प्रश्नांबाबत बुद्धिवादी दृष्टिकोण स्वीकारल्यामुळे आपल्या सहकारी प्रयत्नांच्या सिद्धीसाठीं त्यांचे वागणुकीचे विधिनियम विकसित

होतील. लोकांचे मित्र, तत्त्वज्ञ व मार्गदर्शक म्हणून ते काम करतील; भावी राज्यकर्ते या नात्याने नव्हे.

२६. मानवजातीवरील अत्यंत भयानक व सर्वव्यापी संकटांतून बाहेर पडण्याचा मार्ग नवमानवतावादाचें विमोचक तत्त्वज्ञान दाखवीत आहे. अगदीं मूलगामी विचार करून पाहिला तर मनुष्याचा स्वतःवरील विश्वास उडाल्यामुळेच हें संकट आलें आहे असें शेवटीं दिसून येईल. मनुष्य हाच आपल्या विश्वाचा निर्माता होय, हें इतिहासाचें मूलतत्त्व स्पष्ट करून नवमानवतावाद त्या विश्वासास पुनः संजीवन देत आहे. आणि याच विश्वासांतून निर्माण झालेल्या आपल्या प्रयत्नांना वाढतें यश मिळालेंच पाहिजे या श्रद्धेने रॅडिकल्सनी मार्गक्रमण केलें पाहिजे.

